# वत्सला आणि इतर गोष्टी

प्रो. ना. सी. फडके, एम्. ए.

—प्रकाशक—

कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस पुणें २

# वत्सला ! : : १

गाडीची शिटी झाली, तेव्हां आपल्या म्हाताऱ्या वडिलांना तिनं पुन्हां एकदां म्हटलं, " कामाचं काय होतं तें कळवीन मी तुम्हांला; अन् शक्य तों सोमवारीं येईनच' मी परत. "

तिचे वडील उलट काय म्हणाले तें तिला नीटसं ऐकूं आलं नाहीं पण ती तशीच खिडकींत वाकून उभी राहिली आणि गाडी पुलापलीकडे जाऊन त्या लहानशा स्टेशनावरचीं माणसं अगदीं अस्पष्ट दिसूं लागलीं तरी ती खिडकींतून दूर झाली नाहीं. गावापासून दोन मैलांवर असलेलं बाभळीचं वन तिच्या समोरून मागं सरकत होतं; पाऊसपाणी खूप झाल्यामुळं त्या काटेरी झाडांचे शेंडेसुद्धां हिरवेगार दिसत होते; पलीकडचीं शेतं चांगलीं उंच वाढलीं होतीं; त्यांच्या पात्यांवर ऐन दुपारच्या सूर्याचे किरण एखाद्या जलपृष्ठावर चमकावे तसे चमकत होते; दूर अंतरावर टेकडीच्या पायथ्यापाशीं चरणाऱ्या मेंढ्या लहान लहान काळ्या ठिपक्यांच्या पुंजक्यासारख्या भासत होत्या आणि टेकडीच्या माथ्यावरच्या लहानशा देवळाचे पत्रे दृष्टि दिपावी इतके चमकत होते. यंदाचा दसरा मोठा सुखाचा अन् आनंदाचा जाणार अशीं स्पष्ट चिन्हं सृष्टीच्या मुखमंडलावर दिसत होतीं !

पण सुखाचा अन् आनंदाचा दसरा सर्वांनाच लाभणार होता काय ?......

तिनं एक सुस्कारा टाकला अन् खिडकींतून परतून आपली लहानशी वळकटी तिनं बाकावर ज्या ठिकाणीं ठेवली होती तिथं ती जाऊन बसली.

आतां तिच्या लक्षांत आलं, कीं डब्यांत गर्दी अगदींच कमी होती. तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत इतकी मोकळी जागा असावी याचं तिला आश्चर्य वाटलं. दोनचार कुणब्यांच्या बाया, एक मोठा थोरला सोटा हातीं घेतलेला पुरभैय्यासारखा दिसणारा म्हातारा, घोंगड्यांचं भलं मोठं गाठोडं घेऊन व्यापाराला निघालेला एक मध्य वयाचा, कळकट कपडे केलेला गुजर, आणि...

तिची दृष्टि हिंडतां हिंडतां अगदीं दूरच्या कोपऱ्यांत डोळे मिटून स्वस्थ बसलेल्या तरुण माणसाकडे जातांच ती एकदम चमकली.

इतका सुंदर तरुण पुरुष तिनं आजपर्यंत कधींच पाहिला नव्हता.

त्याचे कपडे उंची नव्हते; परंतु अगदीं परीटघडीचे होते. त्याचा वर्ण अगदीं गोरापान होता, केस काळेभोर होते आणि मिटलेल्या डोळ्यांच्या पापण्या किती लांबसडक दिसत होत्या !

तिनं संभ्रमानं दृष्टी वळविली आणि पदर नीट केला; अन् तसं करतांना तिला मनांतल्या मनांत हंसू आल्यावांचून राहिलं नाहीं. कारण एक तर त्या पुरुषाची व तिची दृष्टादृष्ट झालीच नव्हती आणि शिवाय ती झाली असती तरी तिनं लज्जीत व्हावं असं रूप तिच्याजवळ मुळींच नव्हतं. उलट ती दिसण्यांत कुरूप होती. काळीसावळी, ओबडधोबड नाकाडोळ्यांची, तोंडभर देवीचे वण असलेली देशपांड्यांची वत्सला गावांतल्या सगळ्या लोकांनीं कुरूप ठरविली होती हें तिच्या प्रत्ययाला काय थोड्यावेळां आलं होतं ? आणि तिच्या रूपांतल्या वैगुण्याची अडचण तिच्या मार्गांत

काय कमी आली होती ! मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यानंतर आपल्या पुढच्या शिक्षणाचा भार बापाला सहन व्हायचा नाहीं म्हणून नोकरीच्या खटपटी तिनं पुष्कळदां केल्या होत्या. परंतु प्रत्येक वेळीं तिला नकार मिळाला होता आणि कुणी जरी आपल्या तोंडावर तसं सांगितलं नाहीं तरी आपल्या कुरूपतेमुळंच जिथंतिथं अपयश येतं हें ती जाणून होती. आतां ती पुण्यास एका नोकरीचा प्रयत्न करायसाठीं चालली होती खरी; परंतु मनांतल्या मनांत आशेपेक्षा भीति आणि शंकाच तिला अधिक वाटत होती. तिच्या अर्जा-वरून तिला मुलाखतीला बोलाविलं होतं खरं; पण तिला प्रत्यक्ष पाहिल्यावर...

वत्सलेला आपल्या चेहऱ्याचा किती वेळांतरी संताप येत असे.

कांहीं वेळानें त्या तरुणाकडे पाहावंसं तिला पुन्हा वाटलं आणि धीर करून तिनं पाहिलंहि. वाऱ्याच्या झोतानं त्याचे केस उस्कटत होते, त्यांवर त्यानं आपला उजवा पंजा दाबून फिरविला; पण त्यानं डोळे उघडले नाहींत !

वत्सलेला त्या गोष्टीचं जरा आश्चर्य वाटलं. त्याचे डोळे त्याच्या केसांसारखेच काळेभोर असतील काय तें पाहाण्याची तिला विल-क्षण जिज्ञासा वाटूं लागली. छाती धडधडत असूनहि तिनं आपली नजर त्याच्यावर सारखी रोखून धरली. परंतु काय आश्चर्य ! तो कांहीं केल्या डोळे उघडीना ! कसल्या चिंतनांत तो एवढा मग्न झाला होता ?

रुळांवर खाड्खाड् आवाज झाला. पुढच्या स्टेशनांत गाडी शिरूं लागली. वत्सलेला वाटलं, आतां तर तो डोळे उघडील ? पण गाडी उभी राहिली, डब्यांतला तो पुरभैय्या म्हातारा उतरला, नवीं दोनचार माणसं आपापलीं गाठोडीं घेऊन आंत शिरलीं, गाडी पुढंहि सरकली तरी त्या तरुणाचे डोळे मिटलेलेच होते !

मग मात्र तिच्या मनांत एक शंका चट्कन आली. त्याच्या मिटलेल्या डोळ्यांच्या झाकणांकडे तिनं अगदीं निरखून पाहिलं.

होय. तिची शंका बरोबर होती. तो तरुण पुरुष आंधळा होता!

मनाची ती खात्री पटतांच वत्सलेच्या मनाला दुःखाचा चटका बसला. इतक्या असामान्य देहसौंदर्याची अंधत्वानं विटंबना करावी! किती करुणास्पद ही घटना! त्या तरुणा-बद्दल विलक्षण सहानुभूति तिला वाटूं लागली. तिची दृष्टि अगदीं प्रथम त्याच्याकडे गेली तेव्हां ती मनाशीं उद्गारली होती, "किती सुंदर!" परंतु आतां तिचं मन सारखं घोकूं लागलं, "बिचारा," "बिचारा." तो कोण असेल, कुठं राहात असेल, काय उद्योग करीत असेल, असे प्रश्न तिच्या मनांत येऊं लागले. त्याच्याविषयीं विलक्षण जिज्ञासा तिच्या मनांत उत्पन्न झाली.

कांहीं वेळानं आकाशांत ढग भराभर जमा झाले, सोसाट्याचा वारा सुटला अन् जोराचा पाऊस सुरू झाला.

वत्सलेनं चटकन् खिडकी लावून घेतली.

तिनं पाहिलं तों त्या तरुणाच्या उजव्या बाजूच्या खिडकींतून पावसाचा झोत आंत येत होता. तिनं उठून ती खिडकी बंद केली. तो तरुण हसून म्हणाला, "थँक यू."

ती म्हणाली, "आपण जरा आणखी डाव्या बाजूला सरकाल तर बरं होईल. कारण खिडकी लावली आहे खरी; पण तिच्या फटींतून पाणी आंत येत आहे. तुमची ही छोटी बॅग सरकवूं का थोडी?"

एखाद्या लहान मुलानं ऐकावं त्याप्रमाणं त्यानं तिचं म्हणणं ऐकलं. वत्सलेच्या मनांत आलं, आंधळ्या माणसांना असंच सारखं दुसऱ्याचं ऐकावं लागत असेल! किती परतंत्र त्यांचं जिणं!

ती पुन्हां आपल्या जागेवर जाणार होती इतक्यांत त्यानं विचारलं, "आपण कुठं जाणार?"

ती म्हणाली, " पुण्याला. आपण ? "

" मी मुंबईला जाणार आहे."

" आपल्याबरोबर तर कुणीं दिसत नाहीं..."

" नेहमीं कसं कोण बरोबर मिळेल ? मिरजेला एका स्नेह्यांनीं गाडींत बसवून दिलं. आतां पुण्याच्या स्टेशनवर एक स्नेही येतील, ते मला मुंबईच्या गाडींत बसवून देतील. मग मुंबईच्या स्टेशनवर उतरवून घ्यायला कुणीतरी येईलच."

" पण वाटेंत मदत नाहीं लागत ? "

" लागते. पण बहुधा ती मिळते. आत्तांच पाहा कशी मिळाली ! " असं म्हणून तो हसला.

तिला त्याच्या विनोदाचं हसूं येण्याऐवजीं स्वतःच्या असहाय्यतेचा त्यानं ज्या वृत्तीनं उल्लेख केला ती पाहून त्याच्याविषयीं तिला अधिकच अनुकंपा वाटली.

तिनं विचारलं, " आपण नेहमीं मुंबईसच असतां ? "

त्यानं चटकन् उत्तर दिलं नाहीं. जणू तिच्या शब्दांचा ध्वनि तो इतक्या तन्मयतेनं ऐकत होता, कीं त्याच्या अर्थापर्यंत त्याचं चित्तच पोचूं शकलं नाहीं. मात्र त्याच्या स्तब्धतेचा अर्थ वत्सलेला असा वाटला, कीं तो प्रश्न त्याला टाळायचा असावा.

कांहीं वेळानं त्यानं विचारलं, " तुम्ही आपल्या जागेवर जाऊन बसलांत काय ? "

वत्सलेला आश्चर्य वाटलं ! ती दूर झाली हें त्याला कसं कळलं ? पण लगेच तिच्या मनांत आलं, आंधळ्या माणसांना चाहुलीवरून फार गोष्टी कळतात. आणि हा विचार तिच्या मनांत येतो न येतो तोंच तिला आणखी चकित करण्यासारखा प्रश्न त्यानं विचारला.

तो म्हणाला, "तुमचे वडील तुम्हाला पोचवायला आले होते ना ?"

तिची खात्री झाली, कीं आपण स्टेशनवर चढलों तेव्हांचं आपलं व आपल्या वडिलांचं बोलणं या तरुणानं लक्षपूर्वक ऐकलं असलं पाहिजे. इतकंच काय, आपण ज्याप्रमाणं त्याच्याकडे निरखून वारंवार पाहिलं त्याचप्रमाणं त्याचे कान आपल्या साऱ्या हालचालीकडे असले पाहिजेत. ती कल्पना मनांत येतांच तिला फार गोंधळल्यासारखं वाटलं.

मग त्याच्या प्रश्नाची आठवण होऊन ती म्हणाली, "होय. स्टेशनवर आले होते ते माझे वडीलच." आणि तिच्या मनांत काय आलं कुणास ठाऊक. पुण्यास ती ज्या कामासाठीं चालली होती त्याची देखील हकीकत तिनं त्याला सांगितली.

तिचं तें बोलणं ऐकतांना ती काय सांगत होती तिकडे तर त्याचं लक्ष होतंच; परंतु तिच्या शब्दात त्याला विलक्षण माधुर्य वाटत असलं पाहिजे व त्याकडेच त्याचं चित्त अधिक असलं पाहिजे. कारण त्याच्या चेहऱ्यावर सारखं प्रसन्न हास्य होतं.

तिन्हीसांजांच्या जरा अगोदर पाऊस थांबला. आकाश मात्र निवळलं नव्हतं. त्यामुळं प्रकाश अगदीं कमी झाला होता. गाडींतला दिवा लागला नव्हता. वत्सलेनं खिडकींतून बाहेर पाहिलं तो साऱ्या सृष्टीवर अशी कांहीं एक उदास कळा पसरली होती कीं तिच्याकडे पाहाणाऱ्या माणसाच्या मनांतली गुप्त हुरहुर प्रकट व्हावी. अशा वेळींच औदासिन्यानं भरलेलं काव्य सुचतं, कुणातरी दूरच्या प्रिय व्यक्तीला हाक मारावीशी वाटते, एखाद्या विरहगीताचे चरण गुणगुणावेसे वाटतात !

सृष्टीच्या त्या वृत्तीशीं तादात्म्य पावून वत्सला गुणगुणूं लागली.

**जिवलगा पाहूंऽरे किती वाट ॥**

**हिंडतें धुंडीत होई ना भेटी ।**
**प्रीतीचें निधान येईना हातीं ।**
**झाली बाला श्रांत...**

डब्यांत कोण आहे; कोण नाहीं त्याचंहि भान वत्सलेला राहिलं नाहीं. तिचा आवाज अधिकच निःसंकोच झाला व ती गुणगुणत राहिली,

**वन सळसळतें, मन तळमळतें ।**
**प्राणसख्या तव चाहुल येते ॥**
**काहूर मम...**

ती एकदम दचकून थांबली ! कारण कुणींतरी आपल्या गीताला ताल धरला आहे असं तिला स्पष्ट वाटलं !

तिनं मागं वळून पाहिलं तों त्या तरुणानं आपली छोटी बॅग मांडीवर घेतली होती व आपल्या हातांच्या बोटांनी तो तिच्या झाकणावर तालबद्ध आघात करीत होता.

तिला अगदीं विलक्षण शरमल्यासारखं झालं.

ती स्तब्ध राहिलेली पाहून त्यानं म्हटलं, " कां ? मधेंच कां बंद केलंत ? म्हणा ना. "

तिनं कांहींच उत्तर केलं नाहीं.

तो पुन्हा म्हणाला, " पुढचीं कडवीं याहूनहि चांगलीं आहेत. म्हणा. "

" मी कांहीं गाणं शिकलें नाहीं."

" पण आवाजाची विलक्षण देणगी आहे तुम्हाला. "

त्याचा आग्रह थांबेना तेव्हां तिनं पुढचीं कडवीं म्हटलीं. परंतु यावेळीं तो लक्ष देऊन ऐकत आहे या जाणिवेमुळें तिच्या मनाचा मोकळेपणा नाहींसा झाला होता. गीत संपल्याबरोबर ती म्हणाली,

" मीं सांगितलं नाहीं तुम्हांला मला नीट येत नाहीं म्हणून ? "

तो हसला व म्हणाला, " हो. तुम्ही किती खोटं बोलतां तें कळ‌ऊं मला. "

" खोटं? म्हणजे चांगलं!" असं म्हणून ती त्याच्याकडे बघत राहिली.

पुण्याचं स्टेशन यायच्या जरा आधीं तो तिला म्हणाला, " तुमची हरकत नसेल तर तुमचं नांव आणि पत्ता माझ्या या वहींत टिपून देतां मला? माझी तुम्ही ओळख ठेवावी इतका मी कुणी मोठा मनुष्य नाहीं. पण हें माझं कार्ड असूं द्या तुमच्याजवळ."

वत्सलेनं त्यानं पुढं केलेल्या वहींत आपलं नांव आणि पत्ता टिपला व मग त्याच्या कार्डाकडे पाहिलं,

**विश्वनाथ के. पंडित.**
**गोल्डन व्हॉइस ग्रामोफोन कंपनी,**
**मुंबई.**

नोव्हेंबर १९४०

पुण्याच्या स्टेशनवर एक सूटबूट घातलेला इसम डबे शोधीत शोधीत आला व त्या तरुणाला हातीं धरून घेऊन गेला. जाण्यापूर्वी अदमासानं तिच्याजवळ येऊन तो म्हणाला, " ओळख ठेवाल ना?"

" होय. असं म्हणून ती दूर झाली.

स्टेशनवरून गांवांत आपल्या चुलत मामाच्या घरीं जातांना ती मनाशीं सारखं आश्चर्य करीत होती. मीं खुळ्यासारखं त्या माणसाला खुशाल गाऊन दाखविलं? त्यानं मनांतल्या मनांत माझी चेष्टा खचित केली असेल...पण त्याची तिची पुन्हां गांठ पडण्याचा कांहींच संभव नव्हता. त्यानं तिला मूर्ख ठरविलं असलं तरी त्यांत कांहीं बिघडलं नव्हतं...उद्यांची मुलाखत यशस्वी

झाली आणि ती नोकरी मिळाली, कीं तिची मोठी काळजी संपणार होती.

पण ती संपली नाहीं.

दुसऱ्याच एका स्त्रीची नेमणूक करण्यांत आली. आपली कुरूपता पाहूनच आपल्याला नकार देण्यांत आला असला पाहिजे असा वत्सलेनं स्वतःचा पक्का ग्रह करून घेतला.

दोनचार घटका तिनं निराशेचं दुःख करण्यांत घालविल्या; पण नंतर निराशेची जागा वैतागानं घेतली व तिनं ठरविलं, कीं असं अपयश घेऊन घरीं परत जायचं नाहीं. प्रयत्नांची शिकस्त करून वाटेल ती नोकरी पत्करायची. वीस रुपयांची, पंधरा रुपयांची !

तिच्या वडिलांनीं पत्रावर पत्रं धाडून घरीं येण्याविषयीं आग्रह केला; पण तिनं त्याकडे दुर्लक्ष केलं. तिला नोकरी मिळाली नव्हती, पण तिच्या मनाचा निश्चय बदलला नव्हता. एके दिवशीं तिच्या वडिलांकडून एक जाड लांबट पाकीट आलं. त्यावर "गोल्डन व्हॉइस ग्रामोफोन कंपनी, बॉबे" असं ठळक इंग्रजी अक्षरानं छापलेलं होतं. खालीं तिचं नांव व पत्ता टाइप केलेला होता. तो तिच्या वडिलांनीं खोडून पुण्याचा पत्ता लिहिला होता. पत्र मराठींत टाइप केलेलं होतं.

"आपण नोकरीनिमित्त पुण्यास आहांत कीं घरीं परत आलां आहांत तें कळण्यास मार्ग नाहीं. परंतु आपणांस हें पत्र पोचेल अशी आशा आहे. आगगाडींत झालेल्या थोड्याशा परिचयाच्या आधारावर एक विनंति आपणांस मी करणार आहें. आमच्या कंपनीचा नवीं रेकॉर्डस् घेण्याचा मोसम लवकरच सुरू होणार आहे. नामांकित कलावंतांप्रमाणेंच नवेनवे गायक व गायिका शोधून त्यांचीं रेकॉर्डस् घेण्याचें आज कित्येक वर्षे धोरण ठेवलेलें आहे.

लोकांना नेहमीं कांहींतरी नवें नवें हवें असतें. यंदाच्या नव्या आकर्षणात तुमच्या गाण्यांचा अंतर्भाव करावा अशी माझी इच्छा आहे. त्यासाठीं आपण एकदां मुंबईत आलांत तर आभारी होईन. आपला सर्व खर्च कंपनी देईल. मुंबईस आपलें कोणी ओळखीचें नसल्यास आपल्या राहाण्याची वगैरे सर्व सोय कंपनीमार्फत होईल. आपण केव्हां व कोणत्या गाडीनें निघतां तें कळलें तर कंपनीचा मनुष्य आपणांस स्टेशनवर उतरवून घेण्यास येईल. तरी आपलें उत्तर त्वरित यावें अशी विनंती आहे.

" एक गोष्ट लिहावयाची राहिली. आपलीं चार गाणीं घेण्यांत येतील व त्याबद्दल आपल्याला शंभर रुपये मिळतील ! "

शंभर रुपये ?

वत्सलेला ते शब्द खरेच वाटेनात !

आणि कांहीं दिवसांनीं तिच्या गाण्यांचीं रेकॉर्डस् घेऊन झाल्यानंतर कराराच्या रीतसर कागदावर सही करतांना व कंपनीच्या हिशोबनिसानं तिच्यापुढं ठेवलेल्या शंभर रुपयांच्या नोटांकडे पाहातांना तर तिचा स्वतःच्या दृष्टीवर विश्वासच बसेना !

आणि कागदावर सह्या करून त्या नोटा हातीं घेतांना तिचं अंतःकरण आनंदानं हलकं होण्याऐवजीं दुःखानं जडच झालं होतं. कारण तिचं काम आतां संपलं होतं अन् ती परत गेली तर कुणाची हरकत नव्हती. पण तिच्या स्वतःच्या मनाचीच फार मोठी हरकत होती.

विश्वनाथ आजारी होता. त्याला सोडून जाणं तिच्या जिवावर आलं होतं.

गेल्या पंधरा दिवसांतल्या तिच्या मुंबईच्या मुक्कामांत तिचा व विश्वनाथाचा जो सहवास झाला होता तो पुष्कळच निकट स्वरूपाचा होता. तिच्या गाण्यांचीं रेकॉर्डस् चांगलीं आलीं पाहि-

जेत म्हणून त्यानं आस्थेनें किती मेहनत घेतली होती. तिचा बुजरेपणा नाहींसा व्हावा म्हणून कितीदा परोपरीच्या युक्त्या योजिल्या होत्या ! आणि तिच्या सुखसोयींकडे त्यानं किती बारकाईनं लक्ष पुरविलं होतं !

तिच्या गाण्यांचीं रेकॉर्डस् ज्या दिवशीं घेऊन झालीं त्याच्या दुसऱ्या दिवशीं त्याला ताप भरला आणि आज चारपांच दिवस झाले तरी तो अंथरुणावरच पडून होता. या चारपांच दिवसांत वत्सला शक्य तितकी त्याच्याजवळ बसून राहिली होती. तिनं त्याची परोपरीनं शुश्रूषाहि केली होती. त्याच्या अंथरुणापासून दूर होतांना तिच्या हृदयांत कालवाकालव होत असे; आणि आतां तर त्याला सोडून ती कायमची दूर जाणार होती !

त्याच्या आजारीपणांत कितीदा तरी तिचा हात आपल्या हातीं घेऊन तो स्वस्थ पडून राहात असे. हाताची भाषा हाताला समजत असे. तो आपल्या भावना एखादे वेळीं एखाददुसऱ्या उद्गारानं बोलून दाखवी तेव्हां वत्सलेच्या मनाची अवस्था मोठी कठीण होत असे. एकीकडे तिला वाटे, त्याचं तें अपूर्व प्रेम मुक्तहस्तांनीं घट्ट धरावं. पण दुसरीकडे तिच्या मनांत येई, आपण दिसायला अगदीं कुरूप आहोंत हें याला माहीत नसल्यामुळं हा आपल्यावर लुब्ध असेल; त्याची वंचना करणं योग्य ठरेल काय ? आपलं रूप त्याला डोळ्यांनीं पाहातां आलं असतं तर त्यानं आपल्याला असं जवळ घेतलं असतं काय ? त्याला खरा प्रकार सांगून टाकायला नको काय ?...मग तिला आपलं कर्तव्य कळेनासं होऊन तिचं मन भडभडून येई व तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहात.

एकदां तिचीं आसवं ओघळून त्याच्या हातावर पडलीं. तेव्हां त्यानं दचकून विचारलं.

" वत्सले, रडते आहेस ? "

ती म्हणाली, " छे: ! कुठं ? "

त्याचा हात वर उचलला गेला आणि त्याचीं बोटं तिच्या बाहूवर, कंठाजवळ, गालावर फिरून अखेर डोळ्यांवर विसावलीं. त्या बोटांनीं तिच्या डोळ्यांचा ओलावा पुशीत त्यानं म्हटलं,

" हें काय वेड्यासारखं ? कां रडतेस ? "

तिनं त्याचा हात धरून जवळ घेतला व म्हटलं, " तुम्हीं माझ्यावर केवढे उपकार केलेत ! "

तो हसला व म्हणाला, " रडण्यापेक्षांसुद्धां हें तुझं बोलणं अधिक वेडेपणाचं नाहीं काय ? हं, डोळे पूस अन् काल मला वाचून दाखवीत होतीस तें पुस्तक पुढं वाचून दाखीव."

मग तिनं उठून त्या पुस्तकांतला पुढचा भाग वाचण्यास प्रारंभ केला होता व तिचा गोड आवाज ऐकतां ऐकतां जेव्हां एखाद्या लहान मुलासारखी त्याला झोंप लागली तेव्हां तिच्या डाव्या हातांत राहिलेल्या त्याच्या हातावर त्याला कळणार नाहीं इतक्या बेतानं आपले ओठ टेकल्यावांचून दूर सरकणं तिला कठीण वाटलं होतं.

आणि आतां त्याला सोडून ती कायमची जाणार होती !

त्याचा निरोप घेण्यासाठीं जाण्याचं संकट तिनं दिवसभर कसंतरी टाळलं. एकदां तर तिला वाटलं, कीं पत्र लिहून ठेवावं अन् जावं पण तेंहि तिला करवलं नाहीं. अखेर ती त्याच्याकडे गेली तेव्हां दिवेलागणी झाली होती. त्याच्या खोलींत अगदीं मंद प्रकाशाचा दिवा होता.

दारांत तिची चाहूल झाल्याबरोबर त्यानं विचारलं, "वत्सला ?"

तो तिची अगदीं उत्सुकतेनं वाट पाहात असला पाहिजे.

ती त्याच्याजवळ बसली, त्याबरोबर त्यानं हात पुढं करून तिचा

हात धरला. तिला वाटलं, हात सोडवून घ्यावा; पण तिला तसं करतां आलं नाहीं.

तो म्हणाला, " आज मला बिलकुल ताप नाहीं, उद्यां आपण मिळून स्टूडिओंत जाऊं. "

" उद्या ? छेः, तें कसं शक्य आहे ? "

" तें कां ? "

" माझं काम संपलं कीं आतां. माझा हिशेबसुद्धां चुकता झाला. आज मला शंभर रुपये मिळाले. माझ्या वडिलांना खरंसुद्धां वाटणार नाहीं, कीं त्यांच्या मुलीनं इतके पैसे मिळविले ! त्यांचं कशाला, माझा मलासुद्धां हा सारा प्रकार स्वप्नासारखा वाटतो... "

मनांतल्या खऱ्या भावनांचे कढ लपविण्यासाठीं ती कांहीं तरी बडबडत होती व हसण्याचाहि प्रयत्न करीत होती.

विश्वनाथाच्या तें लक्षांत आल्यावांचून राहिलं नाहीं. तो मध्येंच म्हणाला, " माझं तुला ऐकायचं आहे कीं नाहीं ? "

" काय ? "

" उद्यां आपण स्टुडियोंत जाऊं. "

" अंहं. उद्यां सकाळीं मीं घरीं जाणार. "

" मी तुला कसा जाऊं देईन ? माझ्या बोलावण्यावरून तूं इकडे आलीस ना ? मग माझा निरोप घेतल्यावांचून तूं जाणार ? "

" तें कां ? तो घ्यायलाच आलें कीं. "

" असं होय ? मला सोडून जातांना तुला कांहींच वाटत नाहीं तर ? असं अगदीं सहजासहजीं तुला जातां येईल असं तुला वाटतं ? वत्सले, आतां गप्प कां राहिलीस ? बोल ना ? "

त्याच्या चेहऱ्याकडे ती अगदीं टक लावून पाहात होती. किती असामान्य देखणा होता तो ? आणि ती स्वतः किती कुरूप होती ! मनाचा अगदीं कठोर निश्चय करून ती म्हणाली.

" मला गेलंच पाहिजे उद्यां. "

तिच्या हातांतल्या त्याच्या हातांच्या बोटांची चाळवाचाळव झाली आणि त्यानं विचारलं,

" तुला माझ्याविषयीं कांहींच वाटत नाहीं ? माझं तुझ्यावर प्रेम आहे. माझ्या प्रेमाचा तूं स्वीकार करशील अन् माझ्यापासून कधीं दूर जाणार नाहींस अशी आशा मीं मनाला लावून ठेवली आहे. मला निराश करून तूं जाणार ? "

आजपर्यंत अनेक वेळां केलेले सगळे निश्चय एकवटून वत्सला म्हणाली,

" विश्वनाथ, तुम्ही एका मोठ्या भ्रमांत असाल. तो भ्रम कायम ठेऊन तुमचं माझं जीवित एकत्र गुंफण्यास मीं संमति दिली तर कायमचं दुःख मात्र मी निर्माण करीन. तें मी कसं करूं ? एक तर तुम्ही माझे उपकारकर्ते आहांत अन् शिवाय तुमच्यावर माझं फार प्रेम आहे. "

" वत्सले, खरंच आहे ? "

" होय, खरंच फार प्रेम आहे. "

" आणि तसं असून मला सोडून जाण्याची भाषा बोलतेस ? मला तूं फार हवी आहेस. "

" मी खरी कशी आहे तें तुम्हांला माहीत नाहीं म्हणून हवीशी वाटते विश्वनाथ. "

" कशी आहेस तूं ? "

" माझ्या आवाजासारखी सुंदर मुळींच नाहीं मी. तुमची मोलकरीणसुद्धां शोभणार नाहीं इतकी मी काळी आहें. माझें नाक डोळे ओबडधोबड आहेत. माझ्या साऱ्या तोंडभर देवीचे वण पसरले आहेत. ज्यांना दृष्टि आहे ते लोक मला पाहातांच तोंड वळवितात. तुमच्या स्टूडिओंतले लोक आपापसांत काय

कुजबुजतात माहीत आहे ?—'गोड गळयाची ही घोरपड विश्वनाथांनी कुठून शोधून आणली!' आजपर्यंत जगानं मा॰, तिटकारा केलेला आहे. साऱ्या जगानं जिला तिरस्कारलं, ती ही रूपशून्य वत्सला तुम्हांला पाहिजे ?......"

बोलतां बोलतां तिच्या भावना अनावर झाल्या आणि ती रडूं लागली. तिला वाटलं, झालं, आटपलं सारं ! भ्रम संपला ! सुखहि संपलं ! आतां विश्वनाथाला आपला स्पर्शसुद्धां नकोसा वाटेल.

पण त्यानं उलट तिचा हात अधिकच घट्ट धरला व तो म्हणाला,

"आतां माझं बोलणं ऐक. शरीराचं सौंदर्य दृष्टिसुखासाठीं असतं. मी जन्मांध आहें. आणि जगांतलं दृश्य सौंदर्य कसं असतं तें मला पाह्यला न मिळाल्यामुळं डोळस माणसांना जें सौंदर्य दिसत नाहीं तें पाहाण्याचे दिव्यचक्षू मला लाभलेले आहेत. तुझा कंठ किती मधुर आहे तें मला कळतं. तुझ्या अंतःकरणांतल्या भावनांचं सौंदर्य मी इतरांपेक्षां अधिक पाहूं शकतों. तुझ्या प्रेमार्त हृदयाची भाषा शरीरस्पर्शानं व्यक्त होते तेव्हां तिचे सूक्ष्म अर्थ मला समजतात. सामान्य जनदृष्टि मला नाहीं. परंतु जी अलौकिक दृष्टि माझ्या अंधत्वानं मला दिली त्या दृष्टीला तुझ्यात लावण्याखेरीज मला कांहीं दिसत नाहीं. समजलं माझं म्हणणं ? आतां तरी भ्रमाची शंका तुझ्या मनातून गेली का ? तूं सुस्वरूप आहेस असा भ्रम मला कधींच नव्हता. लोकांनीं तुझा कुरूपपणा मला केव्हांच सांगितला होता. पण माझं प्रेम तुझ्या रूपावर नाहीं—तुझ्यावर आहे. वत्सले, आतां सांग, उद्यां जाणार तूं ?"

ती कांहींच बोलली नाहीं.

मात्र त्यानं तिला जवळ ओढलं आणि मग दोन्ही हातांनीं

तिचं मस्तक चाचपून जेव्हां " वत्सले " अशी अगदीं हलक्या आवाजांत भावनाविवश हाक मारली तेव्हां तिनें चटकन् त्याच्या छातीवर मस्तक टेकलं.

तिच्या डोळ्यांतले अश्रू त्याच्या अंगावर पडले आणि त्यानं आपले ओठ तिच्या केसांवर पुनः पुनः टेकले.

---

# सुमतीचीं मतं : : २

ईस्ट आफ्रिकेंतल्या आपल्या बड्या नोकरीवरून एक महिन्याची रजा घेऊन विश्वनाथ येणार आहे, हें जेव्हां मला प्रथम कळलं तेव्हांच मी ओळखलं होतं, कीं आमचे मित्रवर्य बहुतकरून ब्रह्मचर्याश्रमाला आतां कंटाळले असले पाहिजेत, आणि आपल्याजोगी एखादी चांगली मुलगी मिळाली तर लग्न करण्याच्या हेतूनंच परत मायदेशाला येत असले पाहिजेत. नंतर विश्वनाथाच्या मावशीजवळ जेव्हां माझं बोलणं झालं, तेव्हां तर माझ्या या कल्पनेच्या खरेपणाबद्दल मला मुळींच शंका उरली नाहीं. त्यामुळें विश्वनाथ आला कीं सिनेमानाटकं पहाण्यापेक्षां मुली पहाण्याचाच सपाटा तो अधिक चालू ठेवणार असा मी तर्क केला; आणि शक्य तितकं त्याच्या उपयोगी पडावं या सद्बुद्धीनं माझ्या परिचयांतल्या कोणकोणत्या मुली विश्वनाथाला दाखवितां येतील त्याची मी मनाशीं योजना करून ठेवली.

पण माझा हा साराच हिशेब वांया गेला. कारण इकडे येण्यांत विश्वनाथाचा वधूसंशोधनाचा हेतु असेल असं कांहीं दिसेना. तो आपण होऊन तर स्वतःच्या लग्नाची गोष्ट मुळींच काढीत नसे; आणि त्याच्या मावशीच्या, माझ्या किंवा दुसऱ्या कुणाच्या आग्रहामुळं एखादी मुलगी त्याला पहावीच लागली तर ती पहाण्याचा समारंभ तो कसाबसा उरकी, पण मग वेळ न

घालवितां तो सांगून टाकी, ‘ मला ही मुलगी पसंत नाहीं.’

त्याचं हें करणं मला बरंचसं चमत्कारिक वाटूं लागलं. मला वाटे हा गृहस्थ आतां वयानं कांहीं लहान नाहीं, चांगली पस्तिशी उलटून गेली आहे याची, साडेतीनशें–चारशें रुपयांची नोकरी आहे याला, तिकडे आफ्रिकेंत स्वतःचं घरसुद्धां बांधलं आहेन्, आतां गुजराथी आचाऱ्याच्या हातचं अन्न खात फटिंगासारखे दिवस यानं काय म्हणून काढायचे ? यानं आतां लग्न करून नीट संसार थाटावा हेंच उचित नाहीं का ? माझ्या मनांतली ही विचारसरणी विश्वनाथांजवळ मी एकदोनदां बोलूनहि दाखविली, पण माझं सारं बोलणं ऐकल्यावर चमत्कारिक तऱ्हेनं हंसून विषय बदलण्यापलीकडे स्वारीनं कांहीं उत्तर दिलं नाहीं. त्यामुळं माझ्या मनाला वाटणारा चमत्कार तसाच कायम राहिला.

आणि तो कधींच संपलाहि नसता.

पण एके दिवशीं एक प्रसंग अकस्मात् घडला आणि त्यामुळं साऱ्या गोष्टी एकदम बदलल्या.

विश्वनाथाला परत जायला आता चारपांच दिवसांचाच अवधि उरला होता. गेल्या वीसबावीस दिवसात आम्हीं नाटकसिनेमा पहाण्याचा इतका अतिरेक केला होता, कीं ती करमणूक आम्हां दोघांना नकोशी झाली होती. म्हणून ‘ साल्व्हेशन आर्मी’च्या मुख्य मिस् इव्हँजलाइन बूथ यांचं जाहीर व्याख्यान होतं, त्या व्याख्यानाला जायचं आम्ही ठरविलं. व्याख्यानाला खूप गर्दी झाली होती. आम्ही आपल्या जागीं जाऊन बसल्यावर व्याख्यानापूर्वीचा वेळ कंटाळवाणा होऊं नये म्हणून व्यासपीठावर हलकें हलकें येऊन बसणाऱ्या बड्या मंडळींपैकीं ज्याची मला माहिती होती त्याची मी विश्वनाथाला ओळख करून देत होतों. हे कोण, ते कोण, असं तो आपण होऊन विचारीत नव्हता. केवळ मी सांगेन तेवढं ‘ होय

का, असं का ' असं म्हणत ऐकत होता. व सिगारेट ओढण्यांत मग्न झाला होता. मुंबईतल्या बड्याबड्या धेंडाबद्दल त्याला विशेष कुतूहल नसावं यात मलाहि आश्चर्य वाटण्यासारखं कांहीं नव्हतं. करमणूक म्हणून मीं आपली टकळी चालूच ठेवली होती.

पण मध्येंच मीं आपली सिगारेट पेटविण्यासाठीं खालीं वांकलों असतांना विश्वनाथानं एकदम मला आपल्या कोंपरानं डवचलं आणि हलक्या आवाजांत विचारलं.

" तें कोण तुला माहीत आहे का ? "

मीं व्यासपीठाकडे पाहिलं तों सुमारें तीस वर्षांची एक तरुण स्त्री प्रवेश करून, आपल्या खुर्चीवर बसण्याच्या बेतांत होती. ती फारशी सुंदर नव्हती अथवा पहाणाराचं लक्ष तिच्याकडे एकदम वेधावं अशा तऱ्हेचा थाटमाटहि तिनं केलेला नव्हता. किंचित् पिवळसर रंगाचं साधं रेशमी पातळ ती विकच्छ पद्धतीनं नेसली होती, तिच्या पायांत साध्याच चपला होत्या, मनगटापर्यंतच्या बाह्याचं शर्टवजा पोलकं तिनं घातलेलं दिसत होतं, आणि तिनं आपल्या केसाचा भांग मधोमध पाडला असून त्यांचा सैलसा आंबाडा तिच्या मानेवर होता. विश्वनाथाचं लक्ष तिच्याकडे का वेधलं जावं मला कळेना ! कदाचित् तो दुसऱ्या कुणाबद्दल तरी विचारीत असेल असंहि माझ्या मनांत आलं. म्हणून मीं विचारलं.

" कुणाबद्दल विचारतो आहेस ? "

" त्या स्त्रीबद्दल. पिवळं पातळ. दिसली का तुला ? ती बघ आत्तां खुर्चीवर बसली. कोण ती ? "

मला माहीत नव्हतं.

पण माझ्या शेजारच्या गृहस्थाला मी विचारलं तेव्हां त्याच्याकडून कळलं, कीं त्या स्त्रीचं नांव डॉ. सुमतिबाई. मुंबईत स्त्रियांच्या उन्नतीसाठीं झटणाऱ्या प्रमुख बायकांमध्यें तिची गणना होत होती.

मीं ती माहिती विश्वनाथाला सांगितली तेव्हां 'वाटलंच मला' अशा कांहींशा आविर्भावाची त्यानं मुद्रा केली व तो क्षणभर गप्प बसला.

पण मग लगेच त्यानं मला पुन्हा विचारलं,

"अन् तिच्याबरोबरचा तो गृहस्थ कोण रे? तो पाहिलास का? काळा सूट. टक्कल. हातांत शिसवीची काठी. कोण तो? तोहि डॉक्टरच आहे का?"

मला माहीत नव्हतं.

माझ्या शेजारच्या इसमाला मी विचारलं, पण त्यालाहि माहीत नव्हतं.

त्यामुळं विश्वनाथाची जिज्ञासा कांहीं पूर्ण होऊं शकली नाहीं आणि आमचं तें बोलणं तेवढ्यावरच राहिलं.

पण नंतर व्याख्याम सुरू झालं तरीसुद्धां व्याख्यात्या स्त्रीपेक्षां डॉ. सुमतीकडेच विश्वनाथाचं सारखं लक्ष होतं असं मला दिसून आलं. व्याख्यान सुटल्यावर घरीं जातांना व्याख्यानाच्या विषयाबद्दल त्याच्याशीं बोलण्याचा मी प्रयत्न केला; पण त्याच्याकडून मला विशेष उत्तेजन मिळालं. नाहीं. त्यानं व्याख्यान धडपणें ऐकलंहि नव्हतं असं दिसलं.

जेवण आटोपल्यावर मला रहावेना म्हणून मीं शेवटीं त्याला विचारलं.

"तुला एक गोष्ट विचारूं का?"

"कोणती?"

"रागवायचा नाहींस?"

"नाहीं. विचार."

"संध्याकाळीं डॉ. सुमतीला पाहिल्यापासून तूं एकदम गंभीर कां झाला आहेस?"

" तूं माझ्या जागीं असतास तर असाच गंभीर झाला असतास. "

" म्हणजे काय ? "

" मीं तिला आजच प्रथम पाहिलं नाहीं. तिची माझी एके काळीं फार मैत्री होती. त्या मैत्रीची मला आठवण झाली. आणि त्यामुळं तिला पाहिल्यापासून माझं मन अस्वस्थ झालं आहे. आमच्या त्या मैत्रीची हकीगत तुला सांगावी असं मला सारखं वाटतं आहे. तूं कंटाळणार नसलास तर सांगतों. "

मी म्हटलं, " माझा लेखकाचा धंदा आहे हें तुला माहीत आहे. कुणाची कसलीहि हकीगत ऐकायला मी सदा उत्सुक असतों. "

" अन् मी जी हकीगत तुला सांगणार आहें तिच्यांत तुझ्या विचारालासुद्धां पुष्कळ खाद्य मिळेल. स्त्रियांनीं स्वतःला पुरुषांच्या बरोबरीचं समजावं, आपण कुठल्याहि तऱ्हेनं पुरुषापेक्षां कमी योग्यतेच्या नाहीं असं स्त्रियांनीं मानावं असं तुम्ही पुढारलेले लेखक लोक शिकवतां ना बायकांना—"

" केवळ असंच नाहीं आम्ही शिकवीत. पण तें जाऊं दे. तूं काय म्हणत होतास ? "

" या मताचा अतिरेक कितपत इष्ट आहे अशी माझी अन् सुमतीची हकीगत ऐकून तुला विचार करावासा वाटेल. "

" तुझ्या हकीगतीबद्दल मला आता जास्तीच उत्सुकता वाटायला लागली आहे.

" सांगतों ऐक, " असं म्हणून विश्वनाथानं सिगारेट-केस उघडून माझ्यापुढं केली.

आम्ही दोघांनींहि धूम्रपान सुरू केल्यावर तो म्हणाला, " मीं जरी डॉक्टरीचा कोर्स पुरा केला नाहीं, तरी विद्यार्थी म्हणून मी एक वर्ष मेडिकल कॉलेजांत घालविलं हें कदाचित् तुला माहीत

नसेल. सुमतीची माझी ओळख मेडिकल कॉलेजांत झाली. प्रॅक्टिकलसाठीं आमची जी लहानशी बॅच तयार झाली त्यांत तीच एकटी विद्यार्थिनी होती. पूर्वी पुण्याच्या कॉलेजांत असतांना विद्यार्थिनीशीं मी फारसा बोलत नसे. बोलावंसं वाटण्याइतकी जिज्ञासाच एकीबद्दलहि मला कधीं वाटली नाहीं. पण मेडिकल कॉलेजांत सुमति आमच्या टेबलाशीं काम करीत असतांना प्रथम दिसली तेव्हांपासूनच तिच्याकडे माझं चित्त वेधूं लागलं. ती मोठी देखणी नव्हती, नाजूक नव्हती, किंवा पोषाखी नव्हती. पण तिच्या मुद्रेवर एक विलक्षण करार दिसे, अन् त्यानं मी एकदम आकर्षित झालों. प्रॅक्टिकलच्या वेळेस हत्यारं चालवितांना तिचीं बोटं अशा सफाईनं चाललेलीं दिसत कीं त्यांचं मला कौतुक वाटे. तिनं अभ्यासाच्या बुकावर केलेल्या खुणांत, वहींत केलेल्या टिपणांत, बोलण्यांत, प्रत्येक गोष्टींत कर्तबगारीची विलक्षण ऐट मला दिसे, आणि ती मला फार आवडे.

" आमच्या परस्पर ओळखीचा सुमतीच्या मनावर काय परिणाम होत होता कुणास ठाऊक; पण माझ्यापुरतं बोलायचं झाल्यास थोडे दिवस झाले नाहींत तोंच मी तिच्यावर पूर्णपणें प्रेम करूं लागलों होतों येवढं खास. मीं आपलं प्रेम तिला केव्हांच बोलून दाखविलं नाहीं. कारण एक तर तसं करण्याची मला भीति वाटे. अन् शिवाय असंहि मनांत येई, कीं ती चतुर असली तर ओळखीलहि. तिचा सहवास मला फारसा मिळत नसे, पण जेवढा मिळे तेवढ्यांत ती माझ्याविषयीं पुष्कळ सहानुभूति दाखवी अन् माझ्याशीं अगदीं मोकळेपणानं बोले. पुष्कळदां कॉलेज सुटल्यावर ती व मी मिळून तिच्या घरापर्यंत जात असूं. अशा वेळीं आमचं पुष्कळ बोलणं होई. सुमतीचीं मतं कांहींशीं एकांगी होतीं. प्रत्येक स्त्रीनं आपल्या पायावर उभं रहायला शिकलं

पाहिजे, स्त्रीनं पुरुषावर यत्किंचित्सुद्धां अवलंबून असतां कामा नये, आणि ज्यायोगं स्त्रीचं दास्यत्व सिद्ध होईल अशी एकाही गोष्ट स्त्रीनं पुरुषाला करूं देतां कामा नये, असं ती वारंवार प्रतिपादीत असे. मतं बोलून दाखवितांना तिची चर्या मोठी सुंदर दिसूं लागे; आणि तिचीं मतं खोडून टाकण्याऐवजीं तिच्या चर्येवरील सौंदर्याकडे पहात मी निमूटपणें तिचं बोलणं ऐकून घेत असे.

" तिचीं मतं त्या प्रकारचीं व्हावींत याला तिची घरची परिस्थिति कितपत कारणीभूत होती हें मला कधीं पुरतंसं कळलं नाहीं. पण तिच्या घरची गरिबी होती व आपल्या मामाच्या आश्रयानं ती अभ्यास करीत होती येवढं मला कळलं होतं. ती आपल्या अभ्यासांत अतिशय मग्न असे व या तिच्या मग्नतेचा क्वचित् असा परिणाम होई, कीं एखादे वेळीं आठआठ दिवसांत ती माझ्याशीं दोनचारच औपचारिक शब्द बोले. असे दिवस गेले, कीं माझं मन विलक्षण अस्वस्थ होत असे, आणि केव्हां एकदां तिच्याशीं मला पुष्कळसं बोलतां येईल असं मला होऊन जाई. मग ती मला निवांत भेटावी म्हणून मी हजार युक्त्या करून पहात असे, अन् त्यांत मला अखेर यश आलं म्हणजेच माझ्या मनाची अस्वस्थता थोडीशी कमी होई.

" अशाच एका वेळीं मीं तिला म्हटलं,

" आज आठदहा दिवसांत तुम्ही एकदांसुद्धां माझ्याशीं धड बोललां नाहींत ! "

' तें कां ? काल प्रॅक्टिकलची नवी नोटीस लागली ती मींच तुम्हाला सांगितली. '

' हंः ! तें कांहीं बोलणं नव्हे कांहीं. '

' बोलणं नाहीं ? मग बोलणं कशाला म्हणायचं ? '

‘ भोंवतालीं लोकांचा त्रास नसावा; आणखी दोघांना आपापल्या अगदीं मनांतल्या गोष्टी बोलतां याव्यात म्हणजे जें होतं तें बोलणं.’

‘ अस्सं !’ असं म्हणून ती आपल्या पेन्सिलीचं टोक सॅडपेपर-वर घासूं लागली. तिनं माझ्याकडे पाहिलंहि नाहीं.

“ मी तिला म्हटलं, ‘ उद्यां आदितवार आहे हें तुमच्या लक्षांत आहे का ? ”

‘ खरंच कीं ! उद्यां आदितवार नाहीं का ? ’

‘ हो. तुम्ही अन् मी मिळून उद्यां चार घटका मजेंत घालवूं. ’

‘ उद्यां ?—’

“ ती आतां ‘ नाहीं ’ म्हणून मान हालविणार अशी मला भीति वाटल्यामुळं मीं अतिशय आर्जवानं म्हटलं,

‘ तुम्हीं कबूल केलंत तर मला फार आनंद होईल. ’

“ तिनं चटकन् माझ्याकडे वर पाहिलं व म्हटलं,

“ बरं, ठीक आहे. पण मजेनं वेळ घालवायचा म्हणजे काय करायचं ? ”

‘ तें तुम्ही सगळं माझ्यावर सोंपवा. तुम्हीं ‘ हो ’ म्हटलंत येवढ्यांत तुमची जबाबदारी संपली. आतां पुढची सारी जबाबदारी माझ्यावर. ’

“ सुमति हंसली. ”

“ घरीं परत आल्यावर माझ्या लक्षांत आलं, कीं दुसऱ्या दिवशींचा आदितवार सुमतीच्या संगतींत मजेनं घालविण्याचं अकल्पित भाग्य मला लाभलं होतं खरं; पण पहिल्या तारखेला अजून पांच दिवस अवकाश होता, आणि खाजगी शिकवण्या करून मिळणाऱ्या पन्नास पंचावन रुपयांपैकीं पुरते आठदहा रुपयेहि माझ्या पेटींत शिल्लक नव्हते.

“ पण दारिद्र्याची फिकीर करायची नाहीं असं मीं मनाशीं

ठरविलं, मजेनं झोंपीं गेलों, आणि दुसऱ्या दिवशीं चार वाजता मोठ्या आनंदानं सुमतीच्या बिऱ्हाडीं गेलों.

"तिला घेऊन मी बाहेर रस्त्यावर आलों, आणि पहिली व्हिक्टोरिया दिसली ती हांक मारून उभी केली.

"सुमति म्हणाली, 'गाडी कशाला ? चालत जाऊं आपण.'

'अं हं, गाडी पाहिजे,' येवढंच म्हणून मीं तिला गाडींत बसायला लावलं.

"गाडींत बसल्यावर तिनं मला विचारलं.

'कुठं जायचं ?'

'आधीं छानपैकीं चहा घ्यायचा.'

'कुठल्या दुकानांत ?'

'फोर्टमधल्या अगदीं मोठ्यांतल्या मोठ्या दुकानांत.'

'पण तिथं पैसे फार पडतात.'

'पडूं देत. पैशाची फिकीर करायची नाहीं.'

"खरोखरीच पैशाची फिकीर न करायचं मीं ठरवलं होतं. त्यामुळं चहाच्या बिलाचा आंकडा पहाताच, 'अगबाई, इतके पैसे आपण खर्च केले !' असं जरी सुमति म्हणाली तरी मला तसं मुळींच वाटलं नाहीं. तिच्या सहवाससुखाचा उपभोग मला मिळत होता, आणि त्यापुढं पैशाची काय किंमत होती ?

"नंतर मी सुमतीला घेऊन सिनेमाला गेलों, अन् तिथंहि तिनं 'नको नको' म्हटलं तरी स्टॉल्सचीं तिकिटं मी काढलीं.

"सिनेमा संपल्यावर थिएटरातलंच महाग आइस्क्रीम आम्हीं खाल्लं अन् पुन्हा घरीं जाण्यासाठीं गाडी केली.

"गाडींत बसल्यावर सुमति म्हणाली,

'एकंदर किती पैसे खर्च केले आपण आज ?'

'कुणीं मोजले आहेत ? जाऊं दे कीं.'

' पण मी आतां विचारतें, मोजा ना. '

' हा काय विषय काढलात ? आपण नाहीं मोजणार. '

' बरं, तुम्ही नाहीं तर मी मोजतें. पहिल्यांदां गाडीला दहा आणे दिले. चहाचं बिल अन् वेटरची बक्षिशी मिळून एक रुपया बारा आणे गेले. मग पुन्हा गाडीला सहा आणे दिले. आतां आणखी सहा आणे देणार. आइस्क्रीमचा एक रुपया झाला. अन् सिनेमाच्या तिकिटाचे दोन रुपये चार आणे. म्हणजे एकंदर सहा रुपये सहा आणे झाले. म्हणजे मी तुम्हाला तीन रुपये तीन आणे द्यायचे, नाहीं का ? '

" असं म्हणून तिनं आपल्या हातांतली बॅग उघडली, आणि तिच्यांतून ती पैसे काढूं लागली.

" त्याचं अत्यंत आश्चर्य वाटून मीं विचारलं,

' हें काय करतां तुम्ही ? '

' काय म्हणजे ? खर्चाचा माझा वांटा मी देतें.'

' पण तुम्ही तो द्यावा अशी माझी मुळींच अपेक्षा नाहीं.'

' तुम्हीं तो सोसावा अशी माझीहि मुळींच अपेक्षा नाहीं.'

' तुम्हीं असे पैसे दिले तर मला अपमान वाटेल त्यांत.'

' पण तुम्हीं माझ्यासाठीं खर्च केलांत तर त्यांत मला अपमान वाटणार असला तर ? '

" मीं म्हटलं, ' अपमान ? तो कसा बुवा ? आपण दोघं मिळून मजेनं वेळ घालवूं असं मी तुम्हांला निमंत्रण केलं; तें तुम्हीं मान्य केलंत—'

" ती चटकन् म्हणाली,

' नाहीं कोण म्हणतं आहे ? पण मिळून मजा करायची, अर्थात् खर्चहि मिळून करायचा अशा समजुतीनं मीं तुमचं निमंत्रण स्वीकारलं.

' छे छे, माझी अशी मुळींच कल्पना नव्हती.'

" ती एकदम रागानं म्हणाली,

' मग काय तीन रुपये तीन आण्यांत एका स्त्रीच्या सहवासाचं सुख विकत घ्यायचं अशी तुमची कल्पना होती काय? तुम्हां पुरुषाच्या या कल्पना अत्यंत निंद्य आहेत. पैसे देऊन विकत घेतां येण्यासारखं खेळणं हीच तुमची स्त्रीबद्दल कल्पना काय? मीं असल्या कल्पना मुळींच सहन करणार नाहीं. पुरुषाच्या अगदीं बरोबरीनं वागायला स्त्रियांनीं शिकलं पाहिजे अशा मताची मी आहे.'

" तिच्या त्या बोलण्याचा मला मनस्वी राग आला. मीं म्हटलं, ' समजलं समजलं! पण मी तुमच्याकडून पैसे घेणार नाहीं.'

' मी तुमच्याबरोबर पुन्हा कधीं येणार नाहीं.'

" मी काहींच बोललों नाहीं.

" तीच पुढं म्हणाली, ' हं ' हे पैसे घ्या.'

' घेणार नाहीं.'

" तरी तिनं ते माझ्या शेजारीं गादीवर ठेवले.

" मीं ते उचलले आणि रस्त्यांत फेंकून दिले.

" ती आपल्या घराजवळ उतरली तेव्हां तिचं माझं एका शब्दाचंहि बोलणं झालं नाहीं.

" यानंतर दहापंधरा दिवसांनीं एके दिवशीं आमच्या प्रॅक्टि-कलच्या टेबलावर काम करणारे बाकीचे विद्यार्थी निघून गेले व मी आणि सुमति दोघंच उरलों, तेव्हां ती मला म्हणाली.

' आताशा अभ्यासाकडे तुमचं मुळींच लक्ष नाहीं. परीक्षा किती जवळ आली आहे याची तुम्हांला कल्पना आहे ना?

" इतके दिवसांत आम्ही दोघं एकमेकांशीं एक शब्दहि बोललों नव्हतों, आम्ही एकमेकांच्या दृष्टीला दृष्टीहि एकदांसुद्धां दिली

नव्हती. त्यामुळें सुमतीनं बोलायला प्रारंभ केलेला पाहून मला ।ि.तका आनंद झाला त्यापेक्षांहि आश्चर्य अधिक वाटलं. मी चटकन् म्हणून गेलों,

‘ तुम्ही माझ्याशीं बोलूं शकतां तर ? ’

‘ म्हणजे काय ? ’

‘ नाहीं, त्या दिवशींच्या त्या प्रकारानंतर...मला वाटलं तुम्ही माझ्यावर कायमच्या रागावलांत. ’

‘ चांगला न्याय ! नीट आठवण करून पहा. तुम्हीच रागावलांत. पैसे कुणीं फेंकून दिले ? मीं होय ? मीं मुळींच रागावलें नाहीं तुमच्यावर. फक्त माझीं मतं मीं तुम्हांला स्पष्ट बोलून दाखविलीं, अन् माझ्या मतांप्रमाणं मीं वागलें ! ’

“ मतं ! मतं ! तिच्या विचित्र मतांची मला अगदीं चीड यायला लागली होती...

“ पण त्या मताची चर्चा सुरू केल्यास पुन्हां बिघडेल या विचारानं मी त्याबद्दल बोललों नाहीं.

“ समेट झाला आणि गेल्या पंधरा दिवसांत स्वतःला सुमतीचं विस्मरण पाडून घेण्याचा जो निश्चय मीं केला होता तो पार नाहींसा झाला.

“ ती मला अभ्यासांत मदत करूं लागली. माझे मागें राहिलेले सारे अभ्यास भरून निघावेत म्हणून ती मनःपूर्वक प्रयत्न करूं लागली. ती मला आपलीं पुस्तकं देई, नोट्स् देई, कधीं कधीं एखादा भाग माझ्याकडून घोकूनसुद्धां घेई. जणुं तिनं माझी खाजगी शिकवणीच पत्करली होती.

“ एकदां आम्ही दोघं मिळून फिरायला गेलों. हवा स्वच्छ पडली होती. मजेदार वारं सुटलं होतं. फिरतां फिरतां आम्ही कुलाब्याच्या बाजूला अगदीं एकांत ठिकाणीं जाऊन समुद्रकिना-

ऱ्यावरच्या दगडांच्या राशीवर बसलों. आम्ही दोघंहि कितीतरी वेळ समुद्राच्या पाण्याकडे पहात राहिलों.

" पण मग सुमति एकदम म्हणाली,

' तोंडी परिक्षेंत तुम्हीं पास व्हाल असं वाटतं का तुम्हांला ? '

' पाहूं या, प्रयत्न तर करतों आहें.'

' तुमचे कांहीं भाग फार कच्चे आहेत अजून.'

' घोकंपट्टी करणार आहे साधेल तेवढी.'

' सध्यां कोणता भाग पाठ करतां आहां ? '

' चेहऱ्याचे आणि मस्तकाचे स्नायु.'

" सुमतीनं झटकन् आपल्या चेहऱ्याची एक बाजू माझ्यापुढं केली, आपले दांत एकमेकांवर दाबले, आणि जबड्यावर आपलं बोट टेकून विचारलं, ' ह्या स्नायूचं नांव काय ? '

' या ? याचं नांव ' मस्क्यूलस मासेटेर. '

' हा कुठं सुरू होतो. अन् कसा जोडलेला आहे ?'

" मीं बरोबर उत्तर दिलं तेव्हां ती म्हणाली, ' शाबास ! '

' मीं तिच्या चेहऱ्याकडे आणि कंठभागाकडे सारखं पहात राहिलों, आणि चटकन् म्हटलं,

' तुमचे स्नायु किती बळकट आहेत ! '

' बळकट ? '

' हो एकाद्या पुरुपासारखे पहा ना..' असं म्हणून मीं तिच्या गालांवर माझीं बोटं फिरविलीं.

" मीं तिला केलेला तो पहिलाच स्पर्श होता. माझ्या अंगावर एकदम रोमांच उभे राहिले. मीं झटकन् तोंड पुढं केलं आणि तिच्या गालाचं चुंबन घेतलं.

" सुमति म्हणाली, ' हें तुम्ही काय केलंत ? '

“ मी किंचित् विचित्रपणानं हंसून म्हटलं. ‘ तुमचा ‘ मस्क्यूलस ˉˉसेटेर ’ दाखवला.’

‘ कां ? ’

‘ किती सुंदर दिसतो आहे तो भाग ? ’

“ तिनं आपला ओंठ चावला आणि निर्भत्सनेच्या स्वरांत ती म्हणाली, ‘ यांत तुमच्या हातून शहाणपणा झाला असं वाटतं का तुम्हांला ? ’

‘ चुंबनांत शहाणपणा असावा असं कधीं कुणी सांगितलं आहे ?’

“ माझ्याकडे तिरस्कारानं पाहून ती म्हणाली, ‘ अस्सं ! म्हणजे तुम्हीं माझं चुंबन घेतलंत तर ? ’

‘ हो, मला तें चुंबनासारखंच वाटलं.’

‘ मला नाहीं वाटलं. अन् मला वाटलं नाहीं हें तुमचं नशीब समजा.’

‘ म्हणजे काय ? ’

‘ म्हणजे असं, कीं तुम्हीं माझं चुंबन घेत आहां अशी माझी भावना असती तर मीं तुम्हांला घेऊं दिलं नसतं आणि तुमच्याशीं कधीं बोललें नसतें.

‘ तें कां ? चुंबन घेणं पसंत नाहीं तुम्हांला ? ’

‘ तुम्ही घ्यायला नको, समजलं ? ’

‘ मग कुणीं घ्यायला पाहिजे ? ’

‘ त्या उठाठेवी तुम्हांला काय करायच्या आहेत ? ’

‘ बरं, ठीक आहे.’ असं म्हणून मी उठलों आणि जाऊं लागलों.

‘ पण तिनं माझा हात धरला अन् बसवून घेऊन विचारलं,

‘ रागावलांत वाटतं ? किती झटकन् रागावतां हो तुम्ही ? ’

‘ मीं तिच्याकडे रोपानं पाहून म्हटलं,

‘ तुमच्या अंतःकरणाचा ठावच लागत नाहीं मला.’

' तें कां? हें पहा विश्वनाथ, आपण दोघं एकमेकांचे मित्र आहोंत आपण एकमेकांला मदत करावी, एकमेकाला धीर द्यावा, हें सगळं किती छान आहे! त्यांत ही चुंबनाची भानगड कशाला? आपण इथं सृष्टीशोभा पहात किती मजेनं बसलों होतों, बोलत होतों, हंसत होतों, अन् तुम्हीं एकदम माझ्या गालावरून हात फिरवलांत आणि चुंबन घेतलंत. अन् हें तुमचं करणं मला चमत्कारिक वाटलं याबद्दल तुम्हींच रागावतां?'

" तिचं बोलणं अगदीं सरळ होतं? सूज्ञपणाचं होतं, तर्कशुद्ध होतं. पण त्यामुळंच मला तें आवडलं नाहीं. कारण, ती माझा वेडेपणा सिद्ध करीत होती. मी तिच्याकडे जरा वेळ रोंखून पाहिलं आणि म्हटलं,

' मला समजत नाहीं तें हेंच. तुम्ही माझ्या सुखदु:खांत इतकं लक्ष घालतां, मला परिक्षेंत यश यावं म्हणून झटतां, मला परोपरांनं मदत करतां, आजपर्यंत मला कुणीं दाखविली नाहीं अशी सहानुभूति दाखवितां—या सार्‍या गोष्टी प्रेमावांचून शक्य आहेत? मला वाटलं तुमचं माझ्यावर प्रेम असेल. निदान मीं प्रेम दाखविलं तर तें तुम्हांला रुचेल.'

" सुमति एकदम म्हणाली."

' छे छे, असला महामूर्खपणा मी कधींच करणार नाहीं.'

' महामूर्खपणा! तो कोणता म्हणतां?'

तुमच्यावर प्रेम करण्याचा किंवा तुम्हांला माझ्यावर प्रेम करूं देण्याचा. आपण दोघंहि विद्यार्थी आहोंत, गरीब आहोंत, क्षुद्र आहोंत. प्रेमाचा घातक खेळ आपण खेळलों तर त्याला चांगलीं फळें कधींच यायचीं नाहींत. आपण एकमेकाला काय देऊं शकूं? एकमेकाचं दारिद्र्य! फार तर फुकटचा धीर! आपण दोघांनीं संसार थाटला तर आमटीभाकरी, आणखी कायमची निराशा

आणि भांडणतंटे यांखेरीज आपल्या वांट्याला काय येणार ? ' विश्वनाथ, मी गरिबीचे हाल सोसले आहेत अन् म्हणूनच अभ्यास करून मोठं होऊन खूप पैसे मिळवायचं मीं ठरविलं आहे. प्रेम आणि लग्न याबद्दलचेहि माझे विचार मीं अगदीं टरवून टाकले आहेत. प्रेमाचा अनुभव मला घ्यायचा नाहीं असं समजूं नका. पण मी अशा प्रेमाची वाट पहाणार आहे, कीं ज्याच्या तडाख्यांत सांपडल्यावर मला कसली शुद्धबुद्ध उरणार नाहीं, मी वेडीपिशी होईन असं अलौकिक प्रेम माझ्या नशिबांत नसेल तर मला प्रेमच नको. मी लग्न करीन; पण तेंहि अशा श्रीमंत माणसाशीं कीं आजपर्यंत भोगलेल्या हालअपेष्टांचा सूड म्हणून मला गुडघाभर गादींत सदा लोळायला मिळावं, मनाला मानेल ती ती वस्तु विकत घेतां यावी, कशाची फिकीर म्हणून वाटूं नये. अन् या दोन्ही गोष्टी माझ्या ललाटीं लिहिल्या नसल्या तर मी डॉक्टर होणार, खूप कीर्ति मिळविणार, इतका पैसा कमावणार कीं लोकांच्या स्तुति-निंदेची मला पर्वा राहूं नये, आणखी पुरुषांनीं आपल्या मनोरंजनासाठीं दासी ठेवण्याची रूढि पार उलटून टाकून स्वतःच्या मनोरंजनासाठीं एखाद्या पुरुषाला मी मित्र म्हणून जवळ ठेवणार. '

" मी एकदम दचकलों व म्हटलं, 'काय, काय बोलता हें तुम्ही'

' खोटं नाहीं. हे तीनच मार्ग मीं डोळ्यांपुढं ठेवलेले आहेत. या व्यतिरिक्त चौथ्या मार्गानं मी कधींच जाणार नाहीं. आपल्या दोघांमध्यें प्रेमाचा मूर्खपणा अगदीं घडतां कामा नये. '

" त्यावर मी कांहींच बोललों नाहीं, जरा वेळानं आम्ही दोघं उठलों आणि घरीं परत आलों. वाटेनं आम्ही दोघं एकमेकाशीं एक शब्दसुद्धां बोललों नाहीं.

ती दारांत शिरूं लागली तेव्हां मीं तिला म्हटलं,

'हा माझा अखेरचा नमस्कार समजा.'

"ती पायरीवर थबकून म्हणाली, 'म्हणजे ? हें काय बोलणं ?'

"मी म्हटलं, 'होय असंच तुमचं माझं प्रेम असणं शक्य नाहीं हें तुमच्याकडून मला कळलं तेव्हां यापुढं अभ्यासांत किंवा दुसऱ्या कशात तुमची मदत घेणं मला शक्य नाहीं. इतकंच नाहीं; तर कॉलेजांतसुद्धां आतां मीं रहाणार नाहीं.

"आणि खरोखरीच दुसऱ्या दिवसापासून मीं मेडिकल कॉलेजला रामराम ठोकला.

"त्यानंतर जवळ जवळ दहा वर्षांनीं आज सुमति माझ्या दृष्टीस पडली !

'आणि आज तिला पाहिलं तेव्हांपासून मी साहजिकपणंच मनाशीं सारखा विचार करतों आहें, कीं दहा वर्षांपूर्वी जे तीन मार्ग तिनं आपल्या मनाशीं पक्के ठरविले होते, त्यांपैकींच एका मार्गानं तिला जातां आलं आहे का ? ज्या एकांगी मतांच्या भरीला पडून तिनं माझ्याशीं विचित्र वर्तन केलं, अन् अखेर मला आपल्यापासून दूर लोटलंन्, तीं तिचीं मतं खरीं ठरलीं आहेत का ? का त्याबद्दल तिला आतां पश्चात्ताप होत असेल ? आज व्याख्यानाच्या वेळीं तिच्याजवळ जो पुरुष बसला होता त्याच्याकडे बघून मी सारखा मनाशीं विचार करीत होतों, हा सुमतीचा कोण असेल ? प्रियकर, पति, कीं मनरंजन करणारा पुरुष मित्र ? तूंच सांग, मनात असे विचार चालले असतांना माझं व्याख्यानाकडं कसं लक्ष लागणार ?"

विश्वनाथाची ती एकंदर हकीकत ऐकून माझं मन देखील गंभीर झालं,

तो लग्न करून घ्यायला विशेष कां उत्सुक नव्हता तें माझ्या लक्षांत आलं.

त्या रात्रीं मी सारखा विश्वनाथाचा आणि सुमतीचा विचार करीत होतों. मी सकाळीं उठलों तों असा निश्चय करून, कीं विश्वनाथाला सांगायचं, " अरे, सुमतीच्या आठवणीवर आणखी किती दिवस तूं काढणार आहेस ? दहा वर्षांपूर्वी घडलेली ती हकीगत आतां विसरून जा, अन् चांगलीशी प्रौढ मुलगी पाहून करून टाक लग्न. "

पण पुढच्या दोनतीन दिवसांत तो मला भेटलाच नाहीं.

आणि अखेर जेव्हां भेटला आणि त्याच्या आफ्रिकेला जाण्याबद्दल मीं त्याला विचारलं तेव्हां तो म्हणाला,

" मीं तार करून माझी रजा एक महिन्यानं वाढविली आहे. "

" खरं ? शाबास ! ती कां ? "

" माझं लग्न ठरवून टाकलं मीं."

" कुणाशीं रे ? "

" येवढंहि तुला कळूं नये ? व्यर्थ कादंबऱ्या लिहितोस ! अरे डॉ. सुमतीशीं ! तुझं माझं त्या रात्रीं बोलणं झालं ना, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं मी तिला जाऊन भेटलों अन् तिनं माझा ताबडतोब स्वीकार केला."

" म्हणजे व्याख्यानाला तिच्याबरोबर आलेला पुरुष तिचा प्रियकर, पति, किंवा दास यांपैकीं कुणीच नव्हता तर ? '

" छे ! "

" अन् त्या तिहींपैकीं कोणत्या नात्यानं तुझा स्वीकार केला तिनं ? "

" एकदम तिन्ही नात्यांनीं ! किंबहुना दहा वर्षांपूर्वीचीं आपलीं तीं मतं आततायीपणाचीं होतीं असं सुमतीनं कबूल केलं, अन् माझ्या हातांत हात दिला."

" असं म्हणून विश्वनाथ मोटमोठ्यांदां हंसला !—

---

# चोर आणि साळसूद : : ३

सदानंद महाराजांची स्वारी गुडघाभर उंचीच्या गादीवर पहुडली होती खरी, पण ते लवकर झोंपीं जातील असें लक्षण दिसेना !

किंबहुना झोंपीं जाण्याचा त्यांचा बेतच नसावा ! कारण डोळे अगदीं लख्ख उघडे ठेवून ते उताणे पडले होते, आणि सारें लक्ष खोलीच्या दाराकडे असल्याप्रमाणें ते आपले डोळे अधिकच उघडल्यासारखे करून त्या बाजूला पुनः पुन्हा पहात होते.

मात्र सदानंद महाराज जरी आपल्या मठाच्या अगदीं एकीकडच्या शयनगृहांत अशा प्रकारें अंथरुणावर जागृत नव्हे तर कोणाची तरी प्रतीक्षा करीत असल्यासारखे पडले होते, तरी मठाच्या मुख्य प्रशस्त दालनांत त्या वेळीं जमलेल्या साऱ्या भक्तगणांचा असा समज होता, कीं महाराज झोंपीं गेले. कारण एखाद्या देवळांतल्या मूर्तीप्रमाणें त्यांनीं महाराजांची शेजारति केली नव्हती काय ? त्यांना नानातऱ्हेचीं पक्वान्नें अर्पण करून त्यांनीं कृपावंत होऊन उष्ट्या केलेल्या त्या पक्वान्नांचा प्रसाद त्यांनीं सर्वांनीं भक्तिभावानं ग्रहण केला नव्हता काय ?

त्यांनीं महाराजांना पुष्पहार–संभाराचीं भूषणं चढविलीं नव्हतीं काय ? त्यांना षोडशगुणी तांबूल दिला नव्हता काय ? आणि अखेर महाराजांचें वास्तविक स्वरूप अगदीं कळकट आणि विद्रूप

असूनही जणूं ते विठ्ठलस्वरूपच आहेत असें मानून ' सुंदर तें ध्यान ' इत्यादि निवडक भजनांनीं त्यास आळविलें नव्हतें काय ? अशी घवघवीत शेजारति झाल्यानंतर देव जे शयनमंदिरांत शिरतात ते लगेच झोंपल्यावांचून राहतात का ? मग आपल्याला देवाच्या ठिकाणीं असणारे सदानंद महाराज शेजारति आटपताच शयनमंदिराकडे गेले ते लगेच निद्रावश झालेच असले पाहिजेत. निद्रेवांचून शय्येवंर पडावें लागतें कोणाला ? सामान्य संसारी पाप्यांना ! सदानंद महाराजांसारख्या जीवन्मुक्तांना निद्रावश व्हायला काय उशीर ? समाधि म्हणजे त्यांच्या हातचा मळच ना ?

अशा प्रकारच्या श्रद्धेनें भक्तगणांचा मेळा मठांतल्या मुख्य सभामंडपांत भजन करण्यांत गुंतला होता.

तेथें जवळपास ज्या कांहीं व्यक्ती वावरत होत्या त्यांत पाचसहा अशाही होत्या, कीं आज रात्रीं महाराजांची आणि झोंपेची गांठ लवकर पडणार नाहीं हें त्यांना माहित होतें. परंतु महाराजांच्या या खास शिष्यांना माहित असलेल्या गोष्टी माहित नसल्यासारखं दाखविण्याचें परमार्थज्ञान कांहीं थोडेंथोडकें लाभलें नव्हतें ! म्हणून महाराज झोंपीं गेले अशी आपली भावना असल्यासारखेंच बाह्यतः दाखवीत ती मंडळी देखील इकडेतिकडे वावरत होती.

घटकाभरानें सभागृहांतलें भजन थांबलें. भजनी लोकांचे उंच आवाज महाराजांना आपल्या शय्यामंदिरांत ऐकूं येत होते ते ऐकूं येईनासे झाले. मठांत सगळीकडे सामसूम झाली असें त्यांना स्पष्ट वाटलें; पण अजूनही त्यांच्या. दाराशीं जी चाहूल व्हावी म्हणून ते अगदीं तिकडे कान लावून पडले होते ती होईना. असें कां बरें ? कांहींतरी घोंटाळा झाला कीं काय ?

सदानंद महाराज मनाशीं जरा चिडल्यावांचून राहिले नाहींत. पण असल्या गोष्टींत चिडण्यापासून कांहीं फायदा नसतो हेंही

त्यांना अनुभवानें माहित झालें होतें. ज्याची अपेक्षा ते करीत होते तें हजार हिश्यांनीं चुकावयाचें नाहीं असा त्यांनीं मनाला धीर दिला, आणि त्यांनीं अंथरुणांतल्या अंथरुणांत चळवळ केली.

त्यांना तहान लागल्यासारखें वाटलें म्हणून उशागतच्या चांदीच्या ताब्याकडे त्यांनीं पाहिलें. जरा उठून हात लांब करावा आणि पाणी घ्यावें असें त्यांच्या मनांत आलें; पण ते उठणार इतक्यांत—

खुट्दिशीं कायसें वाजलें!

पाण्यापेक्षां ज्या निराळ्याच गोष्टीची त्यांना इतका वेळ तहान लागली होती ती जवळ आली अशी सुखकारक कल्पना त्यांच्या मनांत आली. आपण शय्येवर स्वस्थ पडलों आहोंत अशी बतावणी त्यांना करावयाची होती म्हणून ते पूर्ववत् पडले.

पुन्हां खुट् असा आवाज झाला.

महाराजांनीं दाराकडे पाहिलें.

काय आश्चर्य! दार मुळींच ढकललें जात नव्हतें!—

दाराऐवजीं पश्चिमकडल्या खिडकीची फळी हादरल्यासारखी वाजत होती!—

पुन्हां पहिल्यापेक्षां किंचित् अधिक मोठ्यानें खुट् असा आवाज झाला!—

महाराजांनीं चमकून वळून पाहिलें—

त्याच क्षणीं खिडकीची चौकटच्या चौकट निखळून पडली आणि एक धिप्पाड व्यक्ति आंत शिरली!

ती व्यक्ति तर भेसूर होतीच, पण तिच्या हातांतील छोटें हत्यार तर अधिकच भेसूर होतें, आणि खोलींत पाय टाकतांच त्या व्यक्तीनें ज्या आविर्भावानें तें दाखविलें आणि डाव्या हाताच्या एका बोटानें 'चूप' अशी निःशब्द खूण केली त्या आविर्भावाचा भयंकरपणा तर पराकाष्ठेचा होता!

त्या व्यक्तीनें ती खूण केली नसती तरीसुद्धां सदानंद महाराज ओरडले नसते; कारण, भीतीनें त्यांच्या मुखावाटें शब्दच बाहेर पडणें शक्य नव्हतें. क्षणापूर्वी कांहीं एका विवक्षित अपेक्षेनें गरम झालेलें त्यांचें रक्त एकदम पार गोठल्यासारखें झालें होतें! भय-भीत होऊन ते आपल्या जागीं अगदीं निश्चेष्ट पडून राहिले.

ती व्यक्ति पुढें सरसावली.

सदानंद महाराजांना वाटलें, हा आतां आपले प्राण घेणार!

पण तसें कांहीं झालें नाहीं. त्या धिप्पाड विक्राळ इसमानें शांतपणें त्यांच्या जानव्याला हात घातला, जानवें कापून किल्ल्यांचा जुडगा हातीं घेतला, आणि अगदीं हलक्या आवाजांत विचारलें,

“ कोणत्या भिंतींत आहे तुझं चोरकपाट? अन् यांतली कोणती किल्ली लागते त्याला?”

सदानंद महाराजांनीं बिनतक्रार त्याला हवी ती माहिती दिली.

त्या चोरानें किल्ली चालवली, कपाट उघडलें, जी रोकड व दागदागिने दिसले तेवढे घेऊन किल्ल्या सदानंद महाराजांच्या अंगावर फेंकून दिल्या, आणि विलंब न लावतां खिडकीवाटें आपला रस्ता सुधारला!

या प्रकारानें सदानंद महाराज अगदीं हतबुद्ध होऊन गेले. त्यांनीं खिडकीच्या दिशेला पाहिलें तों काळ्याकुट्ट आकाशांत आपल्या चकाकणाऱ्या नेत्रांनीं वाकुल्या दाखविणाऱ्या तारकांच्या पुंजाखेरीज त्यांना कांहीं दिसलें नाहीं. काळोख्या रात्रीच्या गडद अंधःकारांतून चांचपडत येणारा वारा त्यांच्या अंगाला झोंबला. त्या वाऱ्याच्या स्पर्शानें, आणि अंतःकरण गोठून टाकणाऱ्या भीतीनें त्यानीं शहारे दिल्यासारखें केलें.

ज्या चोरानें हें धाडशी कृत्य केलें त्याचा चेहरामोहरा त्यांना नीट दिसलाच नव्हता. पण, साऱ्या सातारा जिल्ह्यांत प्रसिद्ध

असलेल्या पिऱ्या मांगाखेरीज दुसऱ्या कुणी आपल्याला लुबाडलें नाहीं याबद्दल महाराजांची खात्री होती.

ते मनांतल्यामनांत पुटपुटले,

" बराय म्हणायचा हा रामोशाचा धंदा ! आम्हीं नाना लटपटी करून, श्रीमंतांना फसवून संपत्ति सांचवावी, आणि या रामोशांनीं पहातां पहातां तिच्यावर खुशाल डल्ला मारावा !—हं: ! काय न्याय आहे पहा !..."

ज्या पिऱ्या रामोशानें सदानंद महाराजांचें डबोलें लुबाडलें तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं सातारा शहरांतील सुप्रसिद्ध वकील खंडेराव दाभाडे यांच्या वाड्याची पायरी चढत होता.

त्याच्या बरोबर त्याचा थोरला भाऊ नाऱ्या होता. या नाऱ्यावर पोलिसांनीं एका खुनाच्या बाबतींत फौजदारी खटला भरला होता, आणि सध्यां तो जामिनावर मोकळा होता. नाऱ्याचा बचाव करण्याचें काम खंडेराव वकिलांनीं हातीं घ्यावें अशी पिऱ्याची फार इच्छा होती. त्यासाठीं त्यानें त्यांच्याकडे आधीं दोनतीन वेळां हेलपाटे घातले होते, पण ते फुकट गेले होते. नाऱ्याची केस हातीं घ्यायला खंडेराव कांहीं केल्या कबूल होईनात.

ते दर वेळीं म्हणत, " अरे बाबा, नाऱ्याच्या विरुद्ध पुरावा जबरदस्त आहे. तो सारा हाणून पाडून त्याला वांचवायचं म्हणजे मला जन्मांत केली नव्हती अशी चतुराई करावी लागेल !—नको बाबा, ही केस तूं दुसऱ्या कुणाला तरी दे. "

आज पुन्हा पिऱ्या मांगानें त्यांची गांठ घेतली तेव्हां त्यांनीं तेंच उत्तर पुन्हा दिलें.

ते म्हणाले, " अरे बाबा, आतां तुला कसं सांगूं ? तुझ्या भावाला या खटल्यांतून सोडवायचं म्हणजे फांसाच्या फळीवर

उभ्या राहिलेल्या इसमाला सोडवून आणायचं म्हणेनास !...हं, जा जा बाबा, नको माझं डोकं उठवूंस !..."

खंडेरावांसारख्या वकिलाच्या नकारावर कोणाची अखेरची मात्रा द्यायची हें पिऱ्याला कोणी सांगायला नको होतें.

त्यानें कुडत्याच्या आंतल्या खिशांतून हलकेंच नोटांचें एक लठ्ठ पुडकें बाहेर काढलें, आणि तें खंडेरावांच्या पायापाशीं ठेवीत म्हटलें,

"मानूस मेलं असलं तरीबी त्येला जिवंत करणारं आपण फाकडं वकील, असा आपला साऱ्या दुनियेंत लौकिक हाये साहेब. आपुन दूर लोटलं तर मी जायचं कुठं साहेब ? वकील काय, पैशा पासरी झाल्याती आतांशा. पर, अलबत्या, गलबत्या, कुडमुड्या वकीलासनी घेऊन काय करतां साहेब ? मी तर आता ह्ये पाय सोडून जायचा न्हाई. आपल्याला घ्यायचं नसलं काम चालवाया तर आपल्या हातानच घ्या या माझ्या दादाचा परान !"

पिऱ्याचें हें रामबाण औषध लागू झाल्यावांचून राहिलें नाहीं.

नोटांचें पुडकें उचलून घेऊन तें निष्काळजीपणानें चाळविल्या-सारखें वरवर दाखवीत पण वास्तविक किती नोटा आहेत तें काळजीपूर्वक पहात वकीलसाहेब म्हणाले,

"तूं असा माझा नाइलाजच केल्यावर काय म्हणायचं ? माझी सारी कर्तबगारी कसाला लावणारी होणार आहे ही केस !—आणि त्यामुळें एक प्रकारें स्फुरणही येत आहे मला ही हातीं घ्यायचं ! वाटतं दाखवूं तरी जगाला एकदां आपली करामत ! पण पिऱ्या, आधींच फौजदारी काम म्हटलं, कीं भारी खर्चाची बाब. आणि त्यांतून तुझ्या भावाचं हें काम म्हणजे गळ्याला लागलेली तात तोडायची आहे म्हणेनास. पाण्यासारखा पैसा ओतावा लागेल तुला—!"

" त्येची काय फिकीर करूं नका साहेब."

यावर वकीलसाहेब हंसले व म्हणाले,

" ठीक आहे. तुझं काम घेतलं समज. अन् तसं कशाला? तुझ्या भावाला वांचवलं असं समज ! पण, आतां जा तूं, इतर कुळांची गर्दी आहे आतां, उद्यां तुझ्या एकट्यासाठीं वेळ ठेवतों. नीट निवांतपणें समजून घेतली पाहिजे केस."

मग पिऱ्यानें व नाऱ्यानें वकिलांना मुजरा ठोकला आणि त्याची रजा घेतली.

वाटेला लागल्यावर पिऱ्या आपल्या भावाला म्हणाला,

" बराय कीं हा वकिलाचा धंदा ! आम्ही परानाची पर्वा न करतां जान मुठींत धरूनशान पैसा मिळवावा, अन् या वकिलांनीं गादीवर बसल्याबसल्या आमच्या हातांतून हजार पाचशेंचा तोडा उचलावा ! हं ! कुठला मुलखावेगळा न्याय तरी हा !"

* * *

त्या दिवशीं रात्रीं वकीलसाहेबांच्या घरांत मोठी गडबड उडून राहिली होती, जिकडे तिकडे रोषणाई झाली होती, दिवाणखान्यांत उत्तम बैठक सुसज्ज केलेली दिसत होती, कारकून व गडी सारखी धांवपळ करीत होते, माजघर-सैंपाकघर वगैरे स्त्रीराज्याच्या हद्दींत वकिलीणबाईंची आणि त्यांच्या मैत्रिणींची धांदल उडाली होती, आणि बाहेर अंगणांत स्वतः खंडेराव कुणाची तरी वाट पहात असल्यासारखे एकदोघां मित्रांशीं गप्पा मारीत उभे होते.

रस्त्यानें जाणाऱ्या मंडळींना साहजिकच कुतूहल वाटूं लागलें, कीं आज वकीलसाहेबांच्या घरीं आहे तरी काय? खंडेरावांची चिक्कूपणा बद्दल ख्याति होती, आणि त्यांना गाण्याबिण्याचा यत्किंचितही षोक नसल्याचें साऱ्या गांवाला माहीत होतें. त्यामुळें चार मित्रमंडळीस मेजवानी, किंवा गाण्याबजावण्याची मैफल त्यांच्या घरीं असेल ही

कल्पना करणेंच शक्य नव्हतें. म्हणून वकीलसाहेबांच्या घरची त्या वेळची ती गडबड पाहून रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या लोकांस विशेषच आश्चर्य वाटत होतें. जो तो दारापुढें थबकत होता व दुसऱ्याला विचारीत होता,

" काय हो, काय आहे गडबड आज वकीलसाहेबांच्या घरीं ?"

तो दुसरा म्हणे,

" काय कळत नाहीं बुवा ! पण कांहीं का असेना, पांच पंच-वीस वर्षांत भिजला नव्हता कुणाचा हात या घरांत, तो आज भिजला तर बरंच होईल ! चिक्कूपणानं सांठवलं आहे डबोलं, लागूं द्या कीं धक्का त्याला थोडातरी. "

यावर मंडळींत थोडा हंशा होई. कोणी पुढें निघून जात आणि कोणी तेथेंच रेंगाळत रहात.

शेवटीं मध्येंच एकदां वकीलसाहेबांचा कारकून कांहीं निमित्तानें बाहेर दारांत आला, तेव्हां रस्त्यावरच्या इसमांतल्या एकानें त्याला विचारलें,

" कायहो लखूनाना ! काय, आहे काय आज वकीलसाहे-बांच्या घरीं ?—बरीच गडबड दिसते आहे ! "

लखुनाना पायरीच्या खालीं उतरला, व तोंडांत सांचलेल्या मुखरसाची सफाईदार पिचकारी गटारांत एक भला मोठा लाकडी ओंडा पडला होता त्याच्यावर टाकून, त्या विचारणाऱ्या इसमास म्हणाला,

" अहो, धोंडूकाका, आज आमच्या इथं एक बडं प्रस्थ यायचं आहे ! "

जणूं लखुनानाच्या पिचकारीला सवाई उत्तर म्हणून आपली भरगच्च पिचकारी त्याच दुर्दैवी लाकडाच्या ओंड्यावर टाकून धोंडूकाकांनीं विचारलें,

" कोण बुवा—कोण यायचं आहे ? "

" सदानंद महाराज यायचे आहेत. "

" अं ? असं का ! वकीलसाहेबांना मूल होत नाहीं, आणि डॉक्टरचीं औषधं अन् ऑपरेशनं करून दमले भागले, तेव्हां अखेर शरण जायचं ठरवलं आहे वाटतं असल्या बोक्या महाराजांना—? "

धोंडूकाकांना हाताच्या खुणेनें आपली जीभ आंवरायचा इशारा देऊन, आणि क्षणभर " अहो, हें काय भलतंच बोलतां ? " अशा अभिप्रायानें तंबाखूनें लालसर काळसर झालेला जिभेचा शेंडा बाहेर काढून अधांतरीं धरून, लखूनाना म्हणाला,

" अहो काका असलं कांहीं बोलायचं नाहीं हं. अहो, असं पहा, आपल्याला करायचं आहे काय सदानंद महाराज खरा साधू आहे का बोका आहे त्याच्याशीं ? आपले मालक ठेवताहेत ना श्रद्धा त्याच्यावर ? बस. मग—"

" अहो, पण खंडेरावासारखा धूर्त मनुष्य या बोक्या महाराजावर श्रद्धा ठेवायला तयार कसा झाला त्याचंच आश्चर्य वाटतंय ! "

" त्याला थोडंसं कारण आहे. अहो, आपल्या साताऱ्याला ते नवे फौजदार आले आहेत ना ? ते आहेत या सदानंद महाराजांच्या अगदीं पट्टशिष्यांपैकीं एक. त्यांनीं दिलं मला वाटतं भरवून आमच्या मालकांच्या मनांत, कीं या महाराजांची दीक्षा घेतली कीं पुत्रप्राप्ति खास होईल म्हणून. फौजदारसाहेबच घेऊन येणार आहेत महाराजांना पाद्यपूजेच्या समारंभासाठीं..."

" अस्सं काय ? अं...बरं काय हो,—"

पण धोंडूकाकांना जें कांहीं आणखी विचारायचें होतें तें ऐकायला लखूनाना तेथें राहिलाच नाहीं.

कारण, त्याच वेळीं रस्त्याच्या कोंपऱ्यांवर एक मोटार वळण

घेऊन येतांना दिसली, व त्या मोटारींत सदानंद महाराजांची स्वारी असली पाहिजे असें त्याला वाटलें. त्यानें पुन्हां एकदां पायरीपासला लाकडी ओंडा आपल्या पिचकारीनें रंगविला, आणि आंत धूम ठोकली.

फौजदारसाहेब सदानंद महाराजांना घेऊन आले, व महाराज मुख्य दिवाणखान्यांत स्थानापन्न झाल्यावर योग्य वेळ काढून त्यांनीं खंडेरावांना खूण करून जरा एका बाजूला नेलें.

खंडेरावांच्या कानांत त्यांनीं विचारलें, " पूजेची सगळी तयारी मीं सुचविली त्याप्रमाणें जय्यत आहे ना ? "

" अगदीं. "

" बरं हें, अं...गुरुदक्षिणा किती देणार आहांत ? "

पांचशेंच्या नोटा काढून ठेवल्या आहेत; बस्स कीं नाहीं ? "

फौजदारसाहेबांनीं आपल्या कल्लेदार मिशा थोड्या चांचपल्या आणि म्हटलें,

" तसं म्हटलं तर पांचशें रुपये म्हणजे कांहीं वावगी नाहीं दक्षिणा ! पण हें पहा खंडेराव, या परमार्थाच्या मार्गांत तुम्हांला अजून अनुभव नाहीं. एक गोष्ट नेहमीं ध्यानांत ठेवली पाहिजे तुम्हांला ती ही, कीं गुरूला सदा कमालीचं संतुष्ट ठेवलं पाहिजे शिष्यानं. महाराजांना काय, पांचशें रुपये दिले तरी सारखंच, पाच दिडक्या दिल्या तरी सारखंच विरक्त आत्मे ते ! पण, आपल्या मनाचं आपण समाधान नेहमीं ठेवलं पाहिजे, कीं आपल्या सामर्थ्याप्रमाणें आपण जास्तींत जास्त करायचं तें केलं—"

खंडेरावांनीं मान हालवली व विचारलें,

" मग काय द्यावी दक्षिणा म्हणतां ? "

" हजारांच्या नोटा ठेवा पायापाशीं. "

हा सल्ला मान्य करणें भागच असल्यामुळें खंडेरावांनीं

त्याप्रमाणें केलें; आणि सदानंद महाराजांची स्वारी तासभरानें घराबाहेर पडून मोटारींत शिरली त्या वेळीं आपल्या विरक्त देहावरच्या तलम रेशमी सदऱ्याच्या लांब खिशांत हजार नोटांच्या पुडक्याचें पाप राहूं देणें त्यांना भाग पडलें. करतात काय बिचारे ? संसाराच्या मोहपाशांतून पामरांची सुटका करायला निघालेले महंत ते ! त्यांतला एक एक पाश आपल्याकडे घेऊन शिष्यांची हलके हलके मुक्तता करणें हेंच त्यांचें अवतारकार्य !

महाराजांना निरोप दिल्यानंतर आपल्या खोलींत येऊन खंडेराव एकटेच बसले तेव्हां ते मात्र स्वतःशींच पुटपुटले,

" बराय म्हणायचा हा साधूचा धंदा. आम्ही रात्रंदिवस मेंदू शिणवून, अन् कोर्टांत हाडाचीं काडं करून पैसा मिळवावा, अन् या बेट्या महाराजांनीं सहजासहजीं हजार रुपयांचं उदक आमच्याकडून हातावर घ्यावं ! हंः ! काय न्याय आहे पहा ! "

* * *

या गोष्टींतला चोर कोण आणि साळसूद कोण हें निःशंकपणें कधीं सांगतां येणें शक्य आहे ?

## जनाबाई : : ४

ती ज्या हमालवाड्यांत राहत असे त्याच्या समोर मुलांची प्राथमिक शाळा होती; आणि बहुतांशीं त्या मुलांच्या आश्रयावरच ती दिवसाकांठी तीनचार आण्यांची कमाई करीत असे.

हमालवाड्याच्या शेजारींच एका पेन्शनर मास्तरांनीं काढलेलं छोटंसं स्टेशनरी दुकान होतं, व मास्तरांनीं परवानगी दिल्यामुळें त्यांच्या दुकानाच्या पुढच्या फळीच्या अर्ध्या भागावर ती आपला माल मांडून बसत असे. शाळा सुरू व्हायच्या आधीं, मग मधल्या सुटींत, अन् शेवटीं संध्याकाळीं शाळा सुटल्यावर सात-सात आठ-आठ वर्षांचीं छोटीं छोटीं मुलं पेन्सिली, कागद, शाईच्या पुड्या अशा वस्तु घ्यायला मास्तरांच्या दुकानांत येत; आणि मग त्यांतलाच एखादा तिच्याकडे वळून म्हणे, ‘ पैशाची गुडदाणी दे ’ किंवा ‘ पैशाला किती पेरू दिले ? ’

*　　　*　　　*

म्हाताऱ्या जनाबाईकडून केळीं, पेरू, गुडदाणी असं कांहीं तरी विकत घेण्यांत त्या लहान लहान बालकांना विशेष गंमत कां वाटावी कोण जाणे; पण ती वाटत असली पाहिजे येवढं खास. कारण रस्त्याच्या दोन्ही बाजूला मुलांना प्रिय असलेली असलीच मिठाई ठेवून एकदोन बाया आणि दोघे बापेहि बसलेले असत. त्या बायका मुलांना हकडं या बाबा, इकडे या. काय व्होवं ? असं

विचारून ओढण्याचाहि प्रयत्न करीत. आणि ते बापे तर 'साखर-लाड्डू, साखरलाड्डू' किंवा, 'शेंग भाजली गराऽम' अशा भसाड्या आवाजांत आरोळ्या ठोकून त्या छोट्या छोट्या गिऱ्हाइकांना दम भरल्यासारखेंहि करीत. परंतु तीं छोटीं गिऱ्हाइकं जनाकडेच जात व हवं ते विकत घेत.

* * *

जनाचं आतां अगदीं वय झालं होतं. सुमारें वीस वर्षांपूर्वी तिचा नवरा तिला टाकून एकाएकीं नाहींसा झाला, व आपली एकुलती एक तान्ही मुलगी राधा हिला घेऊन वाभुळगांव सोडून ती पुण्यास पोट भरायसाठीं आली. तेव्हांपासून नारायण पेठें-तल्या बापटांच्या घरीं तिनें मोलमजुरी केली होती. पुढें बापटांच्या घरचं काम तिला झेपेना इतकी जेव्हां ती थकली, तेव्हां तिला मास्तराच्या फळीवर छोटंसं दुकान थाटून देण्याची कल्पना राधेनं काढली होती.

* * *

राधा आतां एकवीस वर्षांची असेल. ती स्वतः एका मुलींच्या शाळेंत झाडलोट करणं, चिठ्ठ्याचपाट्या पोंचवणं, लहान मुलींना घरून शाळेंत आणणं अशा कामावर होती. बापटांची मधली मुलगी विमलाताई त्या शाळेंत मुख्याध्यापिका असल्यामुळें तिनंच राधाला ही नोकरी दिली होती. राधा रोज सकाळीं लवकर मंडईत जाई. थोडीं केळीं, थोडे पेरू, गुडदाणी, ऋतुमानाप्रमाणें बोरं, मटाराच्या शेंगा, अशी सुमारें रुपयाभराची खरेदी करी, घरीं येऊन त्या सर्व मालाचा थाट ती जनाला मांडून देई, व मग शाळेंतल्या आपल्या कामाला जाई. राधा माल आणि तो अगदीं निवडक असल्यामुळें संध्याकाळपर्यंत तो सारा उठत असे व

म्हातारीच्या कमरेच्या ठिगळाठिगळांच्या पिशवींत तीनचार आण्यांचे फायद्याचे पैसे पडलेले असत.

* * *

शाळा सुरू होण्याची शेवटची घंटा वाजली कीं, रस्त्यावर बागडणारीं आणि ओरडणारीं सारीं मुलं एकदम शाळेच्या दाराकडे धांव घेत. क्षणभरच शाळेच्या मधल्या चौकांत किंवा जिन्याजिन्यांतून वाजलेले त्यांचे पाय बाहेर ऐकूं येत, आणि मग दुसऱ्याच क्षणीं जिकडेतिकडे स्तब्ध होई. बालगोपालांची ती गोड किलबिल अशा प्रकारें एकाएकीं थांबली कीं, समोरच्या दुकानाच्या फळीवर बसलेल्या जनाला कांहीं तरी अशुभ घडल्यासारखं वाटे. ती एक सुस्कारा सोडी आणि एका लहानशा काठीला फडकं बांधून तयार केलेल्या झडप्यानं पुढ्यातल्या फळांवर आणि गुडदाणीवर बसूं पाहाणाऱ्या माशा वारूं लागे.

* * *

मग शाळेच्या मधल्या सुटीच्या वेळापर्यंत जनाला विशेष गिऱ्हाईक मिळत नसे. करंगळी दाखवून मास्तरांची परवानगी काढून बाहेरची हवा खायला एकाददुसरा मुलगा मधून येई, व अशा प्रकारें बाहेर येणारा मुलगा कांहीं तरी खायला विकत घ्यायला म्हणूनच मुख्यतः वर्ग चुकवून येत असे. परंतु हीं मुलं सोडलीं तर त्या दुपारच्या प्रहरीं विशेष गिऱ्हाईक कोठून मिळणार? मग जना अर्धवट डुलकी घेत आणि अर्धवट जागेपणीं हातांतली फडक्याची काठी हलवीत आपल्या मनाशींच विचार करीत राही. या वेळचे तिचे विचार बहुतांशीं आपली लाडकी लेक राधा हिच्याबद्दल असत.

* * *

राधाच्या जन्मापूर्वीच्या गोष्टींच्या आठवणी तिला एखादे वेळीं होत. परंतु त्या ती लगेच मनावेगळ्या करी. त्या दिवसांचं कायमचं विस्मरण पडलं तर तिला हवं होतं. आज जिच्या चेहऱ्यावर काल-पुरुषानं आपली विचित्र रेषालिपि काढली होती आणि जी किंचित् हलत्या मानेनं आणि लुकलुकत्या नेत्रांनीं त्या मोहल्यांत अष्टौप्रहर वेगवेगळ्या प्रहरीं घडणाऱ्या माणसांच्या व्यवहारांकडे पाहत बसली होती. ती जनाहि एकदां लहान होतीच ना. त्या वयांत बाभुळगांवची पंचक्रोशी तिनं पायांखालीं तुडविली होती. समोरच्या शाळेंतल्या त्या बालगोपालांप्रमाणें तिनं द्वाडपणा केला होता, आणि सावत्र आईचा मारहि खाल्ला होता. तिच्या सावत्र आईनं तिचं लग्न ठरवलं होतं, पण बाभुळगांवच्या येशा सुताराच्या मुलाच्या नादीं त्या वेळीं जना लागलेली होती. सावळा हा येशाचा पांचवा मुलगा. बाभुळगांवच्या व आजूबाजूच्याहि जत्रांत कुस्त्या मार-ण्याचा शोक करून त्यानं नांव मिळवलं होतं. जनाचं मन त्यावर लागलं होतं; आणि त्या पोराचंहि तिच्यावर जडलं होतं. दोघांचं लग्न झालं. नंतर जनाचीं तीन चार वर्षं मोठ्या सुखांत गेलीं. पण पुढें बापलेकाचीं नेहमींचींच भांडणं कळसाला पोंचलीं, अन् एके दिवशीं रंगरूट व्हायला जातों म्हणून सावळा जो घरांतून नाहींसा झाला तो कायमचा......

* * *

पण या आठवणी जनाला नको असत. त्या कधीं मनांत आल्या तर समोरच्या फळांवरच्या माशाप्रमाणेंच त्या झटकून टाकल्या-सारखी तिच्या हाताची हालचाल होई, आणि मग ती आपल्या लाडक्या राधेचा विशेष जोरानं विचार करूं लागे...

राधा जेव्हां तेरा वर्षांची झाली तेव्हां जनानं एक चांगलासा मुलगा पाहून जवळ साठवले होते नव्हते तेवढे पैसे खर्च करून

त्याच्याशीं तिचं लग्न लावून दिलं होतं. जावई मोठा कर्तबगार होता. जना हरघडी प्रार्थना करूं लागली होती, देवा ! आतां लवकर आपल्या पायाशीं ने मला. परंतु मृत्यूच्या नजरेला म्हातारीच्या थकलेल्या कुडीऐवजीं तरुणाचा देहच आधीं दिसला. जनाचा जांवई एकदां हौसेनं पंढरीच्या वारीला गेलेला असतांना तिथंच पटकीचा रोग होऊन मेला. एकुलतीएक मुलगी रंडकी होऊन घरीं आली हें पाहून जनाची कंबर एकदम खचली.

* * *

परंतु मनुष्य काय सहन करूं शकत नाहीं ? तेंहि दुःख जनानं अंगावरून जाऊं दिलं आणि परत आलेल्या आपल्या मुलीच्या सहवासांत जनाचे दिवस हळूहळू सुखानंहि जाऊं लागले राधाची आपल्या आईवर विलक्षण प्रीति अन् भक्ति होती. आईला आतां मोलमजुरीचे कष्ट होत नाहींत हेंहि तिला दिसत होत. रंडकेपणा आला म्हणून हातपाय न गाळतां राधा काम करून पैसे मिळवूं लागली; आणि गेल्या वर्ष-दीडवर्षापासून तर आपल्या आईच्या जीवाला थोडासा विरंगुळा म्हणून व थोडं कमाईचं साधन म्हणून तिनं आपल्या कल्पनेनं आईसाठीं रुपया दोन रुपयांच्या भांडवलाचा हा बैठा धंदा काढून दिला होता...

* * *

एका परीनं मायलेकींच्या सुखांत आतां कोणती कमतरता होती ? राधाला शाळेंत बारा रुपये पगार मिळत होता, जना बसल्याबसल्या महिन्याकांठीं पांचसात रुपये मिळवीत होती. येवढ्या मिळकतींत त्यांना रोजची मीठभाकरी आणि सणावाराला गोडधोड उत्तम प्रकारें खातां येत होतं, इतकंच नव्हे तर विमलाबाईनीं मार्ग दर्शविल्यामुळें राधानं पोस्टाच्या बँकेंत नेमानं पैसे टाकायला सुरुवात केली होती; ते आतां शंभराच्या आसपास

गेले होते. परंतु, इतकं असूनहि म्हातारी मनांतल्या मनांत कष्टी आहे हें राधाला दिसत होतं; आणि कोणत्या विचारानं ती कष्टी आहे हेंहि तिनं ओळखलं होतं. तिनं दोन तीन वेळां आईला स्वच्छ सांगितलं होतं,

"आई मला आतां पुन्हा लग्न नाहीं करायचं. तूं हैस तंवर मला आतां दुसरं कोणींच माणूस नको."

पण तिचं हें बोलणं पुनः पुन्हा ऐकल्यावर म्हातारी एक दिवस चटकन् उद्गारली होती, "मग देव मला लवकर मरण आणूं दे तर. तुझ्या जन्माच्या सुखाच्या आड मला कशाला ठेवतो आहे तो उगाच?"

अशी हकिगत असल्यामुळें शाळेंतील मुलं वर्गांत कोंडलीं गेल्यावर दुपारच्या शांत प्रहरीं म्हातारी जना जेव्हां अर्धवट पेंगत आपल्याच विचारांत गर्क होई तेव्हां ती वारंवार मनाशीं म्हणे, "काय करायचं या वेड्या पोरीच्या हट्टापुढें? लगीन करायचं नाहीं म्हणते. अशा का कुठं राहतात तरण्याताठ्या बाया?...

*    *    *

शाळेच्या इमारतीला लागून एक अगदीं अरुंद, दीडखणी, दोनमजली घर होतं. तिथें वरच्या मजल्यावरच्या बिऱ्हाडांतली बाई सारं घरकाम आटपल्यावर आपल्या तान्ह्या मुलाला घेऊन निवांतपणीं पुढच्या गॅलरींत साडेबारा एकाच्या सुमारास नित्य नेमानं येऊन बसे. वर सांगितलेल्या प्रश्नांच्या टप्प्यावर जनाचे विचार यावेत, आणि तिनं मग डोळ्यांवरची झांपड झाडून समोर पाहावं तों आपल्या तान्ह्या मुलाला स्तनापासून दूर करतांना त्यानं रडं काढूं नये म्हणून 'ती पाहिली का काऊ? हात् ग काऊ' असं मोठमोठ्यानं म्हणणारी अदमासें राधाच्याच वयाची ती स्त्री जनाला दिसावी असं कितीदां तरी होई.

*    *    *

आज मात्र जरा निराळीच गोष्ट घडली.

आपल्या विचारांची तंद्री जनानं आपण होऊन मोडली नाहीं. तिला ती मोडावी लागली.

हमालवाड्यांत तिच्या शेजारच्या खोलींत राहणारी बकुळा आपल्यापुढें उभी राहून कांहीं तरी बोलते आहे असं तिला वाटलं म्हणून तिनें आपले डोळे प्रयत्नानं पुरते उघडले. क्षणभर तिला वाटलं हें आपल्याला स्वप्न पडत आहे. परंतु लगेच दुसऱ्याच क्षणीं खरीखुरी बकुळा हातवारे करीत आपल्या पुढें उभी आहे असं तिला दिसून आलं. बकुळा तिला सांगत होती,

" हें बघ तुला इच्यारीत कोनसं आल्यार्ती. तुज्या बाभूळगांवाकडचं आल्याती जनू."

* * *

आपल्या जन्मगांवचं नांव कानीं पडतांच दिव्याची ज्योत एकदम वाढावी त्याप्रमाणें म्हतारीनें आपले डोळे आणि कान दोन्हीं टवकारल्यासारखं केले. बकुळाच्या जरा मागें कुणी तरी उभं आहेसं तिला वाटलं म्हणून त्या व्यक्तीकडे निरखून पाहत तिनं विचारलं, " बाभुळगांवचं तुम्ही ? "

तो तरुण एक पाऊल पुढें सरकून म्हणाला, " मी नाहीं बाभुळगांवचा. मी इथला पुण्याचाच आहे. सोमवार पेठेंत गिलीटकामाचं दुकान आहे माझं. पण बाभुळगांवचे एक पाव्हणे आले आहेत माझ्याकडे, त्यानूला तुमची भेट घ्यायची आहे. पण तुम्ही राहतां कुठें त्यांना नाहीं माहीत. मला ते म्हणाले, " तुम्ही पुण्याचे माहितगार, काढतां पत्ता ? म्हणून मी आलों. "

आपल्या पांढऱ्या केसांवरचा पदर ओढीत जनानं विचारलं, " बाभुळगांवचं पाव्हणं म्हणतां ? म्हंजी कोन ? "

" संतू पाटील आठवतात तुम्हांला ? "

" आतां हें काय इच्यारणं ?" असं उदगारतांना म्हातारी मनःपूर्वक हंसली. एक जुनी गोड आठवण तिच्या मनांत स्फुरली होती. सावळाशीं लग्न लावण्याच्या कामीं तिला म्हाताऱ्या संतू पाटलानं खरा धीर दिला होता.

पण दुसऱ्याच क्षणीं चर्या गंभीर करून तिन विचारलं, " पण संतू पाटील कसं येत्याल ? ते वारल्याचं तर लई वरसांपूर्वी ऐकलं म्या. "

" ते नाहींच आले. त्यांचा नातू आला आहे. रायाला ओळखतां ना तुम्ही ? "

" कसं वळखणार ? आज किती तरी वरसांत मीं गांवाला गेलें नाहीं, का तिकडलं कुणी मला येऊन भेटलं नाहीं. आमचा समंदच तुटल्यावानी झालाय. आज आतां संतू पाटलांचा नातू आमची याद काढून आलाय म्हणतां हेंच लई नवलाचं ! मग कवा घेऊन येतां रायाला ? "

" संध्याकाळीं चारपांच वाजतां येतों घेऊन. "

म्हातारी म्हणाली, " या. या बरं. रायाला सांगा तुझं लई उपकार बाबा, म्हातारीची याद काढलीस. या दिवसात कोन कुनाला इच्यारतं तुमीच सांगा. "

" खरं आहे, खरं आहे...आतां मी जातों अन् चारपाच वाजतां येतों रायाला घेऊन. " असं म्हणून तो तरुण मनुष्य निघून गेला; आणि मग बकुळा परत वाड्यांत जाण्याऐवजीं आपल्या नवऱ्याच्या कागाळ्या म्हातारीला सांगत तिथेंच बसली. तिचा तो ठरलेला विषय होता. पण नवऱ्याच्या छळानं ती खरंच अंतर्यामी गांजलेली होती, आणि ' पोरी देवाला दया येईल तुझी केव्हां तरी हे म्हातारीचे सद्‌गदित स्वरांतले शब्द ऐकले कीं, तिला तेवढयापुरतं फार बरं वाटे.

संतू पाटलाचा नातू संध्याकाळीं येणार म्हणून मधल्या सुटी-नंतर शाळा सुरू झाल्यावर जरा वेळानं जनाबाईनं आपलं दुकान उचललं. राया येईल त्या वेळेस आपण आपल्या खोलींत अस-लेलं बरं असा विचार तिच्या मनांत आला असावा. पाटलाच्या नातवाला आपली खोली घटकाभर बसायसारखी वाटेल कीं नाहीं ही शंका तिच्या मनांत आली. पण ती क्षणभरच. आजूबाजूला न्याहळून पाहतांच तिच्या मनात आलं; पाटलाचा नातूच काय पण त्याहून मोठं कुणी आलं तरी त्याला संकोच वाटणार नाहीं अशा खोलींत. साऱ्या वस्तु राधानं अगदीं टापटिपीनं ठेवल्या होत्या. राधा शाळेंतली नोकरी संभाळून लिहावाचायलाहि शिकत होती, अन् बामणासारखं आपलं घर असावं असं जें तिला वाटे त्याचा प्रत्यय या लहानशा खोलींत येण्यासारखा होता.

राया आपल्या मित्राबरोबर पांचाच्या सुमाराला आला. चांगला धष्टपुष्ट, देखणा जवान दिसत होता तो. त्याला बोलायलाहि पुष्कळ हवं असं दिसलं. त्याच्या भाषणावरून जनाबाईला समजलं कीं, त्याचा बाप त्याला म्हणाला होता, " तूं इतकेदां पुण्याला जातोस तर आपल्या गांवची जनाबाई पुण्यांतच असली तर तिचा एकदां शोध .काढून तिला भेट कीं. " एक-दोनदां त्यानं केलेला प्रयत्न साधला नव्हता. पण शेवटीं आज तो आला होता.

गप्पागोष्टी झाल्या, रायापुढें आणि त्याच्या मित्रापुढें.म्हातारीनं खायचे पदार्थ ठेवले आणि ती म्हणाली,

" तुम्हांला चहा द्यायचा तो राधा घरीं आली कीं मग तीच देईल. मी कांहीं तरी वंगाळ करून ठेवीन. ती लई चांगला करत्ये. यायला झालीच ती आतां इतक्यांत. "

पण साडेपांच झाले, सहा वाजायचा सुमार झाला तरी जेव्हां

राधा उगवली नाहीं तेव्हां म्हातारी काळजीनं चुळबुळ करूं लागली, आणि ‘ अजून कशी येईना ? ’ ‘ सांगितल्याबिगरं अशी राहायची नाहीं ही कधीं ’ असं पुनः पुन्हा पुटपुटूं लागली.

शेवटीं राया म्हणाला, ‘ आतां जातों. ’ तेव्हा ती म्हणाली, “ मग आतां मीच देतें करूनशान् बिगडला तर गोड करून घ्या. म्या तरी काय करूं ? ”

* * *

परंतु तितक्यांत राधा आलीच. तिनं खोलींत पाऊल टाकायला आणि रायाची अन् तिची नजरानजर व्हायला एकच गांठ पडली. तिची मुद्रा उल्हासनं अगदीं ओसंडत होती. तिच्याकडे पाहून म्हातारीलासुद्धां थोडं आश्चर्य वाटलं. कारण तिच्या उल्हसित वृत्तीच्या कारणाची तिला मुळींच कल्पना नव्हती. खोलींत प्रवेश करतांच राधा आईला कांहीं तरी म्हणणार होती; पण खोलींत सतरंजीवर कोणी तरी परकीं माणसं बसलीं आहेत हें पाहिल्याबरोबर ओठांवर आलेले आपले शब्द तिनं परतविले असले पाहिजेत.

बसायला कोण आलं आहे तें म्हातारीनं सांगितलं तेव्हां राधानंहि आनंद दर्शविला. तिनं झटपट चहा करून दिला. तो पितांना रायानं आणि त्याच्या मित्रानं त्याची सारखी तारीफ केली. ती ऐकून म्हातारीला अगदीं धन्य वाटलं.

आपल्याला जायची घाई आहे ही गोष्ट राया आणि त्याचा मित्र विसरूनहि गेले. त्यांनीं निरोप घेतला तेव्हां दिवेलागणी झाली होती.

यापूर्वी राया पुण्याला कितीसा येत असे कोण जाणे. परंतु आतां त्याच्या खेपा बऱ्याच वरचेवर व्हायला लागल्या एवढं खरं. या त्याच्या खेपांमागें कांहीं हेतु असेल असं जनाबाईला अगर राधाला वाटायचं कांहीं कारण नव्हतं. परंतु नंतर एके दिवशीं

एकट्या म्हातारीशीं बोलण्याची वेळ साधून रायानंच तें तिला स्वच्छ सांगून टाकलं.

त्याची पहिली बायको एक वर्षापूर्वी मेली होती. दुसरं लग्न कर म्हणून त्याच्या बापाचा आग्रह होता. तो इतके दिवस त्यानं मानला नव्हता. पण आतां त्याचा विचार बदलला होता. राधा त्याच्या मनांत भरली होती.

त्याचं तें बोलणें ऐकून म्हातारीला आनंदाचा येवढा मोठा धक्का बसला कीं, तिला वाटलं आपण स्वप्नांत तर हें ऐकत नाहीं ? बाभुळगांवच्या संतू पाटलाचं घर म्हणजे आज कितीक पिढ्या मोठं मातबरीचं समजलं जात होतं. त्या घरांत हा तरुण राया आपल्या राधाला मोठ्या सन्मानानं भरली लक्ष्मी म्हणून हात धरून न्यायची म्हणतो !...तिला तें कांहीं वेळ खरंच वाटेना.

पण तें खरं होतं. राधाशीं पाट लावायचा रायाचा अगदीं मनापासून विचार होता.

* * *

त्या दिवशीं रात्रीं लेक जेव्हां नित्याप्रमाणें तिला बिलगली तेव्हां म्हातारीनं तो विषय तिला सांगितला. तिची कल्पना अशी कीं, तें ऐकून आश्चर्यानं आणि आनंदानं पोरगी एकदम स्तब्ध होईल.

परंतु आनंदानं अगर लज्जेनं स्तब्ध होण्याऐवजीं राधा एकदम कठोर स्वरानं म्हणाली,

" भलतं नको तूं बडबडूंस आई कांहीं तरी. "

आणि मग म्हातारीनं जों जों तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, तों तों तिनं अधिकच विरोध दर्शविला, आणि शेवटीं तर 'आई' असं म्हणून कांहीं बोलण्याऐवजीं ती एकदम रडूं लागली.

म्हातारीला तें कांहींच कळेना.

राधालाहि समजेना पुढें आपलं व्हायचं कसं तें.

* * *

आजपर्यंत सतत तिनं आपल्या आईची सेवा केली होती, तिच्या आज्ञेबाहेर ती कधींच वागली नव्हती. तिचा स्वतःचा आनंद तोच तिच्या आईचा आनंद, आणि आईचं सुख तेंच लेकीचं सुख अशा तऱ्हेनं दोघींनीं एकमेकींना सांभाळलं होतं. मग आतांच कां बरं अशी वेळ यावी कीं, आपल्या सुखासाठीं आईनं एक म्हणावं, आणि आपल्या मनाची धांव दुसरीकडेच असावी ?...प्रेम आणि मातृभक्ति यांच्यांतल्या विरोधाचा तरुण राधाला पहिल्यांदाच अनुभव घ्यावा लागत होता.

...तिच्या मनाचा गोंधळ उडाला. आणि मग ती जरी आपल्या आईच्या कुशींत निजली होती तरी तिच्यापासून अगदीं दूरदूर असल्यासारखं तिला वाटत होतं. तिला कांहींकेल्या झोंप येईना. म्हातारीचा घोरल्यासारखा होणारा आवाज एकीकडे ऐकत ती टक्क उघड्या डोळ्यांनीं खपरेलांतून दिसणाऱ्या चांदण्यानं उजळलेल्या आभाळाच्या अगदीं बारीक बारीक ठिपक्यांकडे किती वेळ तरी पाहात राहिली.

तिच्या मनांत एकच विचार येत होता. बाबूची अन् आपली ओळखच व्हायला नको होती. मग आईचं म्हणणं ताबडतोब मान्य करून आपण तिला सुखी करूं शकलों असतों.

पण आपल्या आयुष्याच्या स्लेटपाटीवर प्रेमाचीं जीं अक्षरं स्पष्ट लिहिलीं गेलीं होतीं तीं आतां पुसणं शक्य कुठें होतं ?...

ज्या दिवशीं रायानं जनाबाईचा शोध काढून पहिल्यांदा तिची भेट घेतली, त्याच दिवशीं राधाची शाळा सुटल्यानंतर बाबू व ती मिळून तुतूच्या बागेंत जाऊन एका निवान्त कोपऱ्यांत आपल्या भवितव्याच्या गोष्टी ठरवीत बसलीं होतीं, आणि दोघांच्या आणा-

भाका झाल्या होत्या. त्या दिवशीं तिला घरीं यायला उशीर झाला होता तो याच कारणामुळें; आणि तिनं खोलीचा उंबरठा ओलांडला तेव्हा तिच्या तोंडावर विलक्षण उल्हास खेळत होता त्याचंहि कारण हेंच.

* * *

राधा आणि बाबू यांची पहिली भेट कशी झाली अन् त्या भेटींत कोण कुणाशीं काय बोललं तें दोघानाहि नक्की आठवत नव्हतं. त्या प्रसंगाच्या आठवणी काढून त्या वेळचं संभाषण व्यवस्थितींत जुळवणं हा त्याच्या नंतरच्या गुजगोष्टींच्या वेळचा एक गमतीचा चाळा होता.

ज्या मुलींच्या शाळेंत राधा नोकरीला होती ती एका पेशवाई थाटाच्या जुन्या प्रशस्त वाड्यांत होती. त्याच्या उजव्या बाजूच्या भागांत एक लहानसा छापखाना होता. तिथें बाबू कंपाझिटरचं काम करीत असे. हात धुवायला, पाणी प्यायला तो वाड्याच्या मधोमध असलेल्या कारंज्याच्या हौदावर दिवसातनं तीनचार वेळां जायचा. या हौदावरच त्याची व राधाची पहिल्यांदा गांठ पडली होती.

ओळख वाढत गेली तेव्हां बाबू हौदावर जास्त वेळां जाऊं लागला होता आणि शाळेची शिस्त न मोडतां व कोणाच्या डोळ्यावर येणार नाहीं इतक्या बेतानं शक्य ती संधि साधून राधा त्याच्याशीं बोलूंचालूं लागली होती. शाळेचं छपाई-काम कांहीं फार नसे, पण जें असे तें या शेजारच्या छापखान्याकडेच दिलं जात असे. त्या कामासाठीं छापखान्यांत खेप घालायची झाली तर विमलबाईंनीं आपल्यालाच हुकूम करावा अशा युक्त्या राधा योजूं लागली होती. आणि पुढें पुढें प्रीतीच्या पोटीं उद्भवणारा धीटपणा दोघानाहि ठाऊक झाला तेव्हां राधानं आणि बाबूनें

आपापलीं कामं आटपून बरोबरच निघावं आणि लोखंड्याच्या तालमीच्या कोपऱ्यापर्यंत आल्यावर बाबूनं परत वळावं अन् राधानं पुढं घरीं यावं असं पुष्कळ वेळां होऊं लागलं होतं...

आणि दोन अडीच महिन्यापूर्वी तर दोघानीं लग्नाची आण-भाक केली होती.

आईच्या कुशींत पडल्यापडल्या आज या साऱ्या गोष्टी आठवताना राधाला सुख तर होत होतंच, पण चिंतेचेहि फणकारे तिला बसत होते. प्रीतींतून इतकी दाहक चिंता उत्पन्न व्हावी हा काय विचित्र न्याय असं तिला सारखं वाटत होतं.

त्या रात्रीं तिच्या डोळ्याला डोळा कुठून लागणार ?

दुसऱ्या दिवसापासून मायलेकींमधें एक सूक्ष्म पण क्षणोक्षणीं जाणवणारं असं चमत्कारिक अंतर उत्पन्न झालं. म्हातारी आपल्या लेकीची मुद्रा अगदीं हेरून पाहिल्यासारखी पाहत आपल्या जागीं स्वस्थ बसे. उलट राधाहि आपल्या मनातली गोष्ट आपल्या आईला स्पष्ट कशी सांगायची, तिला आपल्या बोलण्यानं फार दुःख होईल काय, असा मनाशीं अदमास घेत तिच्या चर्येकडे पुनः पुन्हा चोरून पाहत राही. दोघींचीं बोलणीं कमी झालीं. वागण्यातला मोकळेपणा लोपून गेला.

आठ दिवसांनीं राया भेटायला आला तेव्हां राधा घरांत असूनहि कामाची सबब सांगून मुद्दाम चालती झाली; आणि राया निघून जाईपर्यंत परत आली नाहीं, तेव्हां म्हातारीला फार वाईट वाटलं.

दुसऱ्या दिवशीं ती लेकीला म्हणाली, "रायानं लई वाहूळ वाट पाह्यली तुझी."

राधा तुटक स्वरानं म्हणाली, "तें कशापायीं ? मी सांगून नव्हतें व्हय गेलें मला येळ लागल म्हनून ?"

मग म्हातारीनं एकदम मुख्य प्रश्न केला, " रायानं इच्यारलं त्येचं काय उत्तर देऊं मी ? असं लगीन केल्याबिगरच राहणार हाइस तूं मला मराण येई पवतर ? "

राधानं दृढ स्वरांत म्हटलं, " लगीन ठरवलं आहे म्या आपलं."

" म्हंजी ? काय म्हणतीयास तरी काय तूं ? " राधानं विचार केला कीं सागायचं असेल तर याच वेळीं सगळं सांगितलं पाहिजे. तिनं बाबूचा सारा वृत्तांत सांगून टाकला. गेल्या महिनाभरांत त्याच्या आयुष्यांत थोडीशी घडामोड झाली होती. त्याच्या छापखान्यात संप झाला होता, आणि पुढें मालकांनीं जरी संप मिटविला आणि बाकीच्यांना जरी कामावर घेतलं तरी संप घडवून आणणारा मुख्य बाबू होता म्हणून त्याला हाकून दिलं होतं. बाबूचे एकदोन आठवडे बेकारींत आणि मोठ्या फिकीरींत गेले होते. पण तो खटपटी असल्यामुळें त्याला फार दिवस तशा स्थितींत काढावे लागले नव्हते. आठ दिवसांपूर्वींच एका मोठ्या सिनेमा थिएटरमध्यें त्याला डोअर कीपरची नोकरी मिळाली होती. ती मिळाल्याचं त्यानं राधाला सांगितलं तेव्हां ती म्हणाली होती,

" वा, लई चांगलं कीं ! मग आतां रोजच्या रोज फुकट सिनेमा बघायला मिळल मला. "

बाबू हसून म्हणाला होता, " वा, शहाणी किनी तूं ! अन् येवढी काय हपापली आहेस सिनेमा बघायसाठीं. कधीं पाहिला नाहींस होय ? "

राधा मान हलवून म्हणाली, " इकत्या वर्सांत दोनच सिनेमे बघितले हैती मी. तुकाराम लई आवडला व्हता मला. रोज राह्यलं पण सणासुदीला तर सोडशील मला ? "

यावर ' अलबत् , अलबत् ' असं म्हणून तो हसला होता.

आईला सारं सांगतांना राधाच्या मनांत या ताज्या आठवणी आल्या, आणि तिनं बाबूचं वर्णन केलं तें पुष्कळशा अभिमानानं.

परंतु तिच्या त्या बोलण्याचा म्हातारीच्या मनावर कांहीं फारसा अनुकूल परिणाम झालेला दिसला नाहीं. ती कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसली व मग लेकीच्या पाठीवर प्रेमानं हात फिरवीत म्हणाली,

" माजा म्हातारीचा शबूद ऐक. राया सुखी करील तुला. पिरीत दिसायला ग्वाड, पर लई वंगाळ. उगाच कांहीं तरी न्हाइ सांगत म्यां तुला. "

राधाची कल्पना होती कीं, आपल्या व बाबूच्या लग्नाला म्हातारीचा विरोध असेल तो मुख्यतः या कारणानं कीं, त्यामुळें संतू पाटलाचा नातू जांवई व्हायचा तें टळतं. पण तिला हळूहळू दिसूं लागलं कीं, तसं नसून बाबूवर आपण प्रीति करतों हीच म्हातारीच्या दृष्टीनं मूर्खपणाची गोष्ट होती. तिनं वारंवार उद्गारावं " शेन्या आवानं बाप्याच्या नादीं लागू न्हाई. बाप्ये लोक लई गुळचट बोलून साकार पसरत्यात पर शेवटाला गळा कापत्यात बघ पोरी. '

मग राधानं वाद घालायचं सोडूनच दिलं. तिला एक निराळीच युक्ति सुचली.

एके दिवशीं ती म्हातारीला म्हणाली,

" आज रात्रीं एक गंमत दावायला नेणार हाय म्यां तुला. "

म्हातारीनं विचारलं, " कुटं ग ? "

" सिनेमाला. "

" म्हंजी ते दारावरन ढमाडम वाजत रंगीत कागदाचं तुकडं पोरासोरास्नी वाटत जातं त्येला ? त्येच्यांत काय ग पाह्यचं ? मला नगं त्ये."

राधा हसून म्हणाली, " अग जें वाजत जातं ती नुसती जाहिरात असतीया. तिकडे थिएटरात दावत्यात त्ये निराळंच. लई मजा वाटल तुला."

" ललितावानीच असल जनू ? "

" बघ तरी एकदां. तुला लई आवडल."

आणि रात्रीं ती आईला घेऊन सिनेमाला गेली.

*  *  *

थिएटरांतला तो लखलखाट, माणसांची गर्दी, समोर स्टेजवर रुळणारा मखमलीचा भव्य पडदा इत्यादि सारा थाट पाहून उभ्या जन्मांत अशा ठिकाणीं प्रथमच आलेली जना अगदीं बावरून गेली. गादीच्या खुर्चीवर ती बसली ती अगदीं जपून ! कीं जणू ती एखादी जादूची खुर्ची असेल आणि क्षणांत भुर्रकन आपल्यासकट उडूनसुद्धां जाईल, त्याचा काय नियम, असं तिला वाटत होतं. ती अगदीं भयभीत वृत्तीनं सारं पहात होती. पडद्यावरच्या सावल्या आपण पहात असूं हें तिला खरंच वाटेना. साऱ्या गोष्टी प्रत्यक्ष आपल्यासमोर घडत आहेत अशा भावनेनं अगदीं भान हरपून तिनें चित्रपट पाहिला.

घरीं आल्यावर ती दुसऱ्या गोष्टीच बोलेना तें खेडेगांव कसं होतं, ती नदी कशी होती, आगिनगाडी कशी सुटली होती, जत्रा किती मोठी भरली होती, असले उद्गार तिच्या तोंडून सारखे बाहेर पडत होते. मधेंच तिनं विचारलं,

" आपल्याला आंत नेऊन खुरच्यावरतं ज्येनी बसवलं त्ये कोन ग राधा ? "

राधानं विचारलं, " त्ये झकपक पोशाख केलेलं, बूट करकर वाजवीत हिकडंतिकडं हिंडत व्हतं त्ये म्हनतीस ? "

" हां. आपल्या मागच्या दारावर वाढुळभर उभं राह्यलं व्हतं

ना, ते. मंधीच अंधार जाऊन दिवे लागलं तवा आपल्याजवळ येऊन त्येनी विचारलं न्हाइ का तुला कायसं ? ”

“ असं असं, त्ये ऽ म्हनतीस होय ? ” असं म्हणून राधानं चक्क खोटं सांगितलं, “ अग ज्येनी खेळ तयार केला त्येच न्हवं का त्ये; त्येंची आपली, वळख म्हूनतर फुकट पाह्यला आपुन खेळ.”

“ म्हातारी अगदीं आश्चर्यानें दबल्यासारखी होऊन म्हणाली, “ लई मोठी मानसं म्हनायची. अन् वागणूक तरी किती चांगली. ”

“ व्हय की, फार चांगलं हैती त्ये. माझं बाबुराव तुला सांगत्ये त्ये तेच. ”

“ आत्तां ऽ काय करावं ” असं उद्गारून म्हातारीनं उजव्या तळहातानं आपलं बोळकं एकदम झांकलं आणि मग ती आपल्या लेकीकडे पाहतच राहिली.

* * *

दुसऱ्या दिवशीं राधा बाबूला भेटली तेव्हां त्यानं विचारलं,

“ काय म्हणते आई तुझी ? ”

राधा हसत म्हणाली, “रुकार मिळालाय तिचा. पर तो मिळवाया-साठीं मी दाट्टून जें खोटं बोलल्ये तें आतां तुमी निस्तरलं पाहिजे.

“ काय सांगितलंस तूं ? ”

“ मी म्हटलं खेळाचं मालक तुमी हैती. तुमीच बनवलाय त्यो.”

“ वा, लई हुशार कीं तूं. डोरकीपरचा मालक बनवून टाक-लास मला ! अन् आतां हें पाप मीं निस्तरायचं कसं ? ”

“ खरंखुर मालक एक दिवस होऊनशान् ! ”

“ बरं बरं ” असं म्हणून तिच्या भाबडेपणावर तो मनांतल्या मनांत प्रसन्न होऊन हसला; व त्याच्या रेखीव मुद्रेकडे प्रीतीच्या नजरेनं पाहतांना राधाला मनापासून वाटलं, आपला बाबू होईलहि एक दिवस मालक, कां नाहीं होणार ?

मग ती त्याला म्हणाली, " आईनं एक अट घातली है हं. "

" ती काय बाबा ? "

" तुम्ही आमच्या घरीं आलं पाहिजे अन् खंडोबापुढें शपत दिली पाहिजे. "

" शपत ? ती कसली ? "

" मला कधीं अंतर देणार नाहीं म्हनून. "

" हें असलं कधीं ऐकलं नव्हतं बुवा कुणी. "

यावर राधानं आपल्या आईची तरुणपणची हकीकत सांगितली व ती पुढें म्हणाली,

" दुधानं तोंड पोळलं तिचं, तवा ताक बी फुंकरून प्यावं म्हनत्ये ती !

" म्हंजे मी ताक व्हय ? वा ग ! "

" कां ? कमी आंबट खट हायेस का ? ताक न्हाइ तर काय ? " तिरप्या नजरेचा बाण मारीत राधा म्हणाली,

बाबूला हसूं आलं. तो म्हणाला, " तुझं नांव राधा, तवा दुधाताकाच्याच गोष्टी सुचायच्या तुला ? माझी राधा ! "

राधान मुरका मारून म्हटलं, " सिनेमाच्या दारावर उभं राहून राहून ह्ये ह्येल शिकलास वाटतं. हं, चल. घरीं म्हतारी वाट बगत असल तुझी माझी ! "

* * *

म्हातारी खरंच वाट पाहत होती.

तीं दोघं आलेलीं पाहतांच तिला वाटलं राधाकृष्णाची जोडीच आली दारांत हसत आनंदांत. तिच्या मनांत आलं, कशाला घ्यायची बाबूकडून खंडोबाची आणभाक ? प्रीतीनं ज्याचा चेहरामोहरा असा डंवरला आहे तो कधीं अंतर देईल आपल्या लेकीला ? पण तितक्यांत तिला एक जुनी आठवण झाली.

सांवळाचाहि असाच फुललेला चेहरा तिनं पाहिला होता !...तें नको, बाबूला खंडोबा पुढें आणभाक घ्यायला लावलंच पाहिजे. पुरुषाच्या प्रीतीवर तिचा भरंवसा नव्हता, अन् राधाच्या जन्माच्या सुखात कधीं उणं पडेल ही शंका तिला निवारायची होती.

* * *

पंधरा दिवसांनीं शाळेंतल्या मुलांना जनाबाई समोरच्या फळी-वर दिसेना. स्टेशनरी दुकानांत त्यांनीं विचारलं.

" म्हातारी कां नाहीं बसली आज केळीं-पेरू घेऊन ? तेव्हां त्याना कळलं कीं, ती आता कधींच यायची नाहीं. मुलांना हिर-मुसल्या सारखं झालं.

रस्त्याच्या कडेला पाट्या घेऊन बसलेल्या त्या दोन बाया आशेनं आर्जवून म्हणाल्या, " हकड या, बाबा, हकड या ना ! काय व्होवं ? "

पण तीं मुलं गेलीं नाहींत.

बोरेंवाला कर्कशून ओरडला, " बोरं बाण्येरीऽ ! साकरफुटानं–"

शेंगावाल्यानं आरोळी ठोकली, " भाजली गराऽ ऽ म ! "
पण मुलं तिकडेही वळलीं नाहींत !

म्हातारी जनाबाई नव्हती आपल्या ठरीव जागेवर तर त्यांना खायला विकत घ्यावंसं वाटेना.

पण हें त्या दिवसापुरतंच.

दुसऱ्या दिवसापासून ते बालगोपाल त्या दुसऱ्या बायांकडून अन् गाडीवाल्याकडून काय हवं तें विकत घेऊं लागले !

जगांत माणूस माणसाची इतकीच आठवण ठेवतो !

' झंकार ' खास द्वितीय वर्षारंभ अंक. ता. १० ऑगस्ट १९४१.

---

# लक्ष्मीपूजन : : ५

अहाहा ! अशा सुंदर वेण्या त्यानें जन्मांत कधीं पाहिल्या नव्हत्या !

गिरगांवच्या कोंपऱ्यावरच्या त्या माळयाच्या दुकानांत वास्तविक रोजच या संध्याकाळच्या वेळीं वेण्यांची रांगच्या रांग मांडून ठेवलेली असे, आणि मनोहर ब्यांकेंतून सुटून ट्रॅमनें येऊन कोंपऱ्यावर उतरतांच त्याचे डोळे क्षणभर त्या वेण्यांच्या रांगेवर रोजच्या रोजच घोंटाळत असत.

पण रोजच्या वेण्या निराळ्या आणि आजच्या या वेण्या निराळ्या ! वेणीतलीं एकेक मोगऱ्याची कळी अशी टपोरी होती ! छे ! असा बटमोगरा कधीं कोणी पाहिला नसेल ! एकेक कळी म्हणजे शुभ्र सौंदर्याचा जणू बुंदच होता ! आणि त्या कळ्यांची गुंफा करणारी रंगीत लोंकर आणि चमचमणारी कलाबतू इतक्या बेतानें मधून मधून डोकावत होती कीं जणूं त्या कोंवळ्या कलिकांना सावरण्यापुरतेंच आपल्याला पुढें झालें पाहिजे हें तिला कळत होतें ! आणि वेण्यांची आजची मुरडही कांहीं निराळीच होती. एकेक वेणी अशी गेंदेबाज आणि लाडकी दिसत होती कीं, तिच्यापुढें मोत्यांचे सर फिके पडावे आणि हिऱ्यांनींही गर्वगलित होऊन श्वास टाकावा !

मनोहर झटकन पुढें झाला. त्यानें एक वेणी घेतली, व एक रुपया फेंकला.

माळी मोड देत होता तेवढ्यांत त्यानें विचारलें,

' आजचा मोगरा छान आहे. '

' छान ! असा बंगलोरी मोगरा कधीं घावायचा नाय ! परभाच्या बाया यड्या व्हतात ना याला पायला कीं ! अन् आज येनीं गुंफली हाय बी कशी ? हां ! फुकाचे नाहीं घ्यायचे मला दाम—'

' हो हो ' असें कांहींसें पुटपुटत मनोहर तेथून निघाला व घरीं आला. घरीं येतांना त्यानें वेणी खिशांत लपविली होती. कपडे न काढतां तो लक्ष्मीला म्हणाला—

' तुझ्यासाठीं खिशांत एक जम्मत आणली आहे. ओळख ! '

' इश्श् ! ओळखायचं काय त्यांत ?–मी कातणं आणायला सांगितलं होतं अन् रोज विसरणं चाललं होतं तें असेल दुसरं काय ?—'

' अशी अरसिक आहेस ! '

' मग काय बाई, आम्हांला नाहीं बाई ओळखत. सांगावं. '

' सांगणार. नाहीं–दाखविन–अशी जवळ ये ' असें म्हणून मनोहरनें तिला हातानें धरून ओढलें.

' इश्श् हें काय ?—त्या खिडकीतनं दिसत आहे लोकांना ! ' असें बोलतांना लक्ष्मीचा आवाज अगदीं भेदरल्यासारखा झाला होता.

मनोहरनें वळून पाहिलें तों खरेंच ! नळापाशीं उभ्या असलेल्या दोन तीन वयस्क बायांनीं त्यांचें तें करणें पाहिलें होतें व त्या तोंडाला पदर लावून एकमेकींत हंसत होत्या ! छी ! काय पीडा ! चाळींत राहण्यासारखं दुसरं पातक नाहीं !

मग लक्ष्मीचा हात सोडून मनोहर म्हणाला, ' बरं मी नाहीं घालत, तूंच घाल, ही बघ वेणी आणली आहे. '

मनोहरची कल्पना होती कीं, वेणी पाहतांच लक्ष्मी आनंदभरानें हंसेल व आपल्याकडे प्रेमकटाक्ष टाकून लडिवाळपणानें मान मुरडील. पण तसें कांहीं करण्याऐवजीं लक्ष्मी डाव्या हातांत वेणीचा उलगडलेला पानपुडा तसाच धरून म्हणाली,

‘ इश्श् ! अशी वेणी कशाला आणली गडे ? ’

‘ म्हणजे ?—आश्चर्यानें मनोहरनें विचारलें,

‘ ही वेणी छाकटी नाहीं कां दिसत ? ’

‘ छाकटी ?—’

‘ नाहींतर !—मी नाहीं बाई ही घालायची ! ’

असें म्हणून तिनें ती मनोहरच्या टेबलावर टाकली, आणि ‘ अगबाई ! चहाचं आधण ठेवायचं आहे ! ’ असें म्हणत ती लगबगीनें आंतल्या खोलींत गेली.

त्यानंतर दोन तीन वेळां मनोहरानें वेणीची गोष्ट काढून पाहिली; पण दर वेळीं लक्ष्मीनें वेणीं घालायचें नाकारलें. खरोखरच तिला त्या वेणीचें जणूं भय वाटत होतें.

तिच्या नकाराचें मनोहरानें प्रथम कौतुक केलें. पण शेवटीं त्याला तिचा रागच आला. आपल्याला कोणी पेशवाईतलें चक्री पागोटें घालायचा आग्रह केला तर आपण काय करूं असा विचार कांहीं त्याला सुचला नाहीं. पुरुषांना नाहींच सुचत असले विचार.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत जावयासाठीं तो कपडे करूं लागला तेव्हां वेणीचा तो उलगडलेला पुडा त्याच्या टेबलावर तसाच पडलेला त्याला दिसला.

मोगऱ्याच्या त्या कळ्या किंचित् कोमेजल्या होत्या. जणूं लक्ष्मीनें केलेला अपमान त्यांना सोसला नाहीं !

टायची गांठ बांधतां बांधतां मनोहर मध्येंच थांबला. त्यानें

ती वेणी खसकन घेतली व खिडकीबाहेर भिरकावून दिली! ती फेंकतांना तो अर्धवट मोठ्यानें स्वत:शीं म्हणाला,

'महामूर्ख आहे लक्ष्मी—!'

अशा प्रकारचा प्रसंग हा कांहीं पहिलाच नव्हता.

आणि असे प्रसंग घडत त्याचा दोष पतिपत्नीपैकीं कोणाचा होता तें सांगणें कठीण होतें.

मनोहर बँकमध्यें नोकर होता. त्याचें नुक्तेंच लग्न झालें होतें व लक्ष्मीला घेऊन येऊन मुंबईत त्यानें स्वतंत्र बिऱ्हाड केल्याला पुरे दोन महिनेही लोटले नव्हते.

नव्या संसारात पतिपत्नी थोडीं रमलीं होतीं. पण दोघांच्या वृत्ति अगदीं भिन्न असल्यामुळें नव्या सुखावर विरजण पडण्यासारखे प्रसंग वारंवार घडत.

मनोहरास छानछोकीची फार आवड होती, फॅशननें वागण्याची त्याला चटक होती व आपल्या पत्नीनेंही नटावें मुरडावें व आपण म्हणूं तसें आपल्याबरोबर नाचावें अशी त्याची तीव्र इच्छा होती. बाह्य दिमाखापेक्षां व छानछोकीपेक्षां अंतरंगांतलें प्रेम स्त्रीकडून मिळालें तर त्यांत आपलें मन वास्तविक रमलें पाहिजे हा समज त्याच्या अल्लड मनाला अजून आला नव्हता.

उलट लक्ष्मीच्या स्वभावांतही किरकोळ गोष्टींत नवऱ्याचें ऐकल्यानें त्याचें मन अंकित होतें येवढें समजण्याइतकें चातुर्य आलें नव्हतें. ती स्वभावतः भारदस्त व गंभीर होती व तिच्या माहेरचें वळण अस्सल जुन्या तऱ्हेचें होतें, त्यामुळें मनोहर ज्या त्वरेनें तिला फॅशनच्या वाटेनें ओढून नेऊं पहात होता ती तिच्या स्वभावाला असह्य होई व मग ती प्रसंगविशेषीं जरा दुराग्रह दाखवी. वेणीचा प्रसंग झाला तो यापैकींच.

लक्ष्मी आपल्या जुन्या वळणाप्रमाणें संसारदक्ष असे. मनोहर

कामावर गेला म्हणजे डाळ तांदूळ निवडणें. पापड करणें असलीं गृहकृत्यें ती करी किंवा शेजारच्या लेकुरवाळ्या बायकांस गृहकृत्यांत मदत करण्यांत ती आपली करमणूक करून घेई.

उलट मनोहराच्या डोळ्यापुढें बँकेंतलीं लेजरबुकें भरतां भरतां देखील फॅशनेबल संसाराचीं चटकदार चित्रें दिसत असत. आणि घरीं येतांच भाजी चिरण्यासारख्या नीरस कामांत असलेली लक्ष्मी त्याच्या दृष्टीस पडली कीं तिनें चटकन उठून करून दिलेला सुंदर चहाही त्याला गोड लागत नसे.

वेणीच्या त्या प्रकारानंतर कांहीं दिवसांनीं दुसरा एक तसाच प्रसंग घडला.

रविवार होता. संध्याकाळीं फिरायला म्हणून लक्ष्मीला घेऊन मनोहर निघाला. त्याला नवा पंपशू घ्यावयाचा होता म्हणून दोघें मिळून एका दुकानांत शिरलीं.

मनोहरनें पंपशू पसंत करून घेतला, व मग लक्ष्मीच्या पायांतल्या जुन्या वाहणांकडे पहात तो म्हणाला,

'तूंही घेईनास ?'

'काय ?'

'बूट.'

'इश्श् ! बूट नाहीं घालतां यायचा मला !'

'अग यायचं काय त्यांत ?' मनोहरनें म्हटलें, 'इतर बायका घालतात त्या ? संवय झाली कीं झालं. हं, काढरे यांच्या मापाचा सुंदर बूट !'

दुकानदारानें ताबडतोब बुटाची पेटी काढली व त्यांतील बूट काढून त्यांचें पॉलिश उठून दिसावें म्हणून तें आपल्या बाहीवर चोळीत, लक्ष्मीच्या पायावर ते चढवून दाखविण्यासाठीं तो तिच्यापुढें येऊन बसला.

पण लक्ष्मीनें पाय पुढें करण्याऐवजीं कपाळाला आंठ्या घालून म्हटलें, ' इश्श् ! मला नको ! ' व पाय मागें ओढून घेतला.

दुकानदारानें किंचित् हंसून प्रश्नात्मक दृष्टीनें मनोहराकडे पाहिलें. मनोहर लक्ष्मीला म्हणाला, हें काय ?—दे ना पाय !—'

' नको बाई ! मला नाहीं बूट वापरायचे—'

' नाहीं ऐकायचं ? ' मनोहर रागानें म्हणाला.

' लोकांत बरं नाहीं दिसायचं गडे. मी चपला घेतें ' असें लक्ष्मी आर्जवानें म्हणाली, पण तिच्या शब्दांत निश्चयाचा स्पष्ट ध्वनि होता.

मनोहर संतापून उठला व म्हणाला,

' लोकांना बरं नाहीं दिसायचं !—हंः ! अनवाणींच चाल म्हणजे लोकाना बरं वाटेल कदाचित् !—'

लक्ष्मी कायसें मिनतवारीनें पुटपुटली, पण चारचौघांच्या देखत नवऱ्याशीं अधिक आर्जवानें बोलून त्याच्या रागाचें शांतवन करणें तिला शक्य नव्हतें.

मनोहरानें दुकानदाराचे पैसे रागारागानें चुकते केले व लक्ष्मीकडे वळूनही न पाहतां जणूं ती आपल्याबरोबर नाहींच अशा आविर्भावानें तो निघाला.

लक्ष्मीचें तोंड अगदीं गोरेंमोरें झालें. ती मुकाट्यानें मनोहरच्या मागोमाग गेली.

दुकानदारानें आपल्या साथीदाराकडे पाहून डोळे मिचकावले व दोघेही ' खूप गंमत आहे ! ' अशा अर्थी हंसले.

वाटेनें पतिपत्नींत काहींच भाषा झाली नाहीं.

मनोहर मनाशीं म्हणत होता. ' माझ्यासाठीं हिनं येवढंही ऐकूं नये ! हंः अगदीं कमाल आहे !—'

लक्ष्मी मनाशीं म्हणत होती, ' बुटांतच काय एवढं आहे काय

जाणं बाई !—माझं प्रेम कां नाहीं !—पण ! भलतंच कांहीं तरी काय काढायचं !—'

कांहीं दिवसांनीं दोघांनीं मिळून नाटकाला जावयाचा मनोहरानें बूट काढला. त्याची मर्जी राखतां येईल तितकी राखावी असें वाटून लक्ष्मीनें रुकार दिला. त्यामुळें मनोहरला फार आनंद झाला व बँकेंत जातांना आधीं थिएटरकडे जाऊन त्यानें दोन जागा रिझर्व्ह केल्या.

आज आपण बायकोला घेऊन जाऊन जोडीनें नाटक पाहणार या कल्पनेच्या आनंदांतच तो संध्याकाळीं घरीं परत आला तेव्हां होता. पण घरीं येतो तों लक्ष्मीचे मामा अकस्मात् दुपारींच पाहुणे म्हणून येऊन उतरल्याचें त्याला आढळून आलें.

मनोहर मनांत म्हणाला 'या काकामामांना तर ऐन वेळीं येऊन दावा साधायसाठींच देवानं जन्म दिला आहे जणूं !—'

त्यानें वरकांती हास्य करून मामांना नमस्कार केला व कुशल प्रश्नही विचारले. पण ते विचारतांना त्यानें मनांतल्या मनांत म्हाताऱ्याला शिव्यांची लाखोली वाहिली.

मामांशीं बोलायचें तें बोलून मनोहर बाहेर उठून पुढच्या खोलींत आला तेव्हां लक्ष्मी बाहेर येऊन म्हणाली,

'मामांचं तिसरं तिकीट काढायला हवं.'

'तें कशाला ? —'

'आपण नाटकाचा बेत केलेला मीं त्यांना सांगितला तेव्हां ते म्हणाले मीही फार दिवसांत नाटक पाह्यलं नाहीं, मी येईन तुमच्याबरोबर.'

'मूर्ख आहेस तूं ?—त्यांचं लोढणं कशाला आपल्या—'

'इश्श् !–असं काय बोलणं गडे—'

मनांतला जळफळाट दाबीत मनोहरनें बतावणी केली, 'पण

आतां तिकीट मिळणं अशक्य आहे. सगळया खुर्च्या रिझर्व आहेत. मामांना आठ आण्यांच्या जागेंत बसूं दे वाटलं तर.'

'असं कसं गडे?'

'असं कसं तर मी काय करूं?'

'मग आतां?'

'आतां काय, मामा निजतील घरीं. नाहीं तरी ते आज प्रवासानं शिणलेलेच असणार. त्यानीं झोंप काढलेलीच बरी. आपण जाऊं दोघे नाटकाला.'

'छे! छे!' जीभ चावीत लक्ष्मी म्हणाली.

'छे! छे काय? जायचं! मी सांगतों मामांना मग तर झालं?"

'अं हं! मान हालवून लक्ष्मीनें म्हटलें.

'नाहीं ऐकायचं माझं?' असें म्हणत मनोहर तिचा हात हातांत घेण्याच्या बेतांत होता.

पण लक्ष्मीनें झटकन हात मागें घेतला व म्हटलें,

'आपण जायचं? छान! वडिलांची कांहीं लाज ठेवायची आहे कीं नाहीं? इतकें बोलून ती जरा फणकाऱ्यानें आंत गेली.

मनोहरही फार रागावला.

जेवण झाल्यावर मामा व्हराड्यांत गेले आहेत असें पाहून मनोहरनें पुन्हां एकदा लक्ष्मीला म्हटलें,

'चला कीं मी सांगतों मामांना.'

'नको गडे. नाटक काय, केव्हांहि आहे. मामा आज प्रथमच आपल्या घरीं आलेले. त्यांना ठेवून गेलों तर आपल्याविषयीं त्यांचं मत बरं व्हायचं नाहीं. एकटं जावं वाटलं तर.'

'नाहीं सोडीत आपला हट्ट तूं?'

लक्ष्मीनें त्याच्याकडे पाहण्याचें टाळून खालीं बघत नकारार्थी मान हालवून म्हटलें 'अंहं,—पण आपण जावं एकटं—'

'मी एकटा जाईन नाहीं तर दुकटा जाईन ! तुला काय ?'

असें रागारागानें उद्गारत मनोहर तेथून उठला व बाहेरच्या खोलींत आला.

त्यानें अस्वस्थपणानें खोलींत दोनचार येरझारा घातल्या मग तावातावानें कोट टोपी चढवून, लक्ष्मीला न सांगतांच बाहेर पडून त्यानें थिएटरचा रस्ता सुधारला.

खेतवाडींत तो शिरला तेव्हां वाटेनें एक तरुण जोडपें चाललेलें त्याला दिसलें. त्यांपैकीं स्त्री म्हणत होती,

'नाटकाचं पुस्तक आणलं नाहींच बरं का.'

'अरे, विसरलों. बाबूरावाकडून आणणार होतों, पण ऑफिसांतून घाईनं परत आलों त्या धांदलींत आठवणच राहिली नाहीं.'

'इश्श् ! सदा बरी आठवण रहात नाहीं.'

'बरं, आपण थिएटरांत विकत घेऊं पुस्तक.'

'हो घ्यायलाच हवं. तुमचा गंधर्व इतकं हळू बोलतो कीं पुस्तक हातांत असलं तरच कांहीं समजतं.'

यावर तो तरुण हंसला, व त्याच्याबरोबर भराभर चालतां चालतां स्त्रीनें हात मागें करून आपला आंबाडा चाचपला. त्या आंबाड्यावर एक सुंदर ताजी वेणी असलेली मनोहरास दिसली !

त्या जोडप्याचा त्याला मोठा मत्सर वाटला. खेद करीत तो मनाशीं म्हणाला,

'लक्ष्मीनं मूर्खपणा केला नसता तर मीही यावेळीं अशाच सुखात असतों. त्या भित्र्या, हट्टी पोरीपासून मला सुख लागण्याची कांहीं आशा नाहीं !'

लक्ष्मीविषयीं त्याचें मन अगदीं विटल्यासारखें झालें. तो विषण्ण चित्तानें वाट चाल्त होता.

कोपऱ्यावर तो वळत होता इतक्यांत त्याला कोणीसें हांक मारून हटकलें.

त्यानें वर पाहिलें व नमस्कार करीत विचारलें,

‘ ओहो ! रंगराव ?–नाटकाला निघालां ? ’

‘ नाहीं बुवा, माझं अजून जेवण व्हायचं आहे. पण आपली स्वारी अशी अगदीं कष्टी कां ? ’

वास्तविक रंगराव कांहीं मनोहराचा जीवश्च कंठश्च मित्र नव्हता. पण कांहीं वेळाच अशा चमत्कारिक असतात कीं माणसाला आपल्या मनातल्या तुडुंब भावना अनावर होतात व त्या तो कोणाजवळही प्रगट करतो.

त्यामुळें मनोहर थांबला व त्यानें सारी हकीगत रंगरावाला सांगितली. ती ऐकून रंगराव म्हणाला,

‘ हात्तिच्या, येवढंच ना ? मी तुझ्या खिन्नतेवर औषध देतों. असं रामबाण औषध आहे आपल्याजवळ कीं यंव !—चल माझ्याबरोबर. ’

त्याच्या त्या बोलण्याचा मनोहरला नीटसा उलगडा झाला नाहीं, पण तो रंगरावाच्या मागोमाग गेला मात्र.

रंगराव आपल्याला घेऊन कोठें निघाला आहे त्याची मनोहरास कल्पना होईना. त्याचे पाय यंत्रासारखे चालले होते येवढेंच.

गल्लींतल्या एका जिन्यावरून चढून गेल्यावर एका दारावर रंगरावानें थाप मारली.

दाराला पत्रें आंत टाकायला करतात तशी एक फट होती तिच्यावरची खिटी सरकवून आंतून कोणीं तरी विचारलें,

“ कोण तें ?–’ तो स्त्रीचा आवाज होता.

आपण कोठें आलों याची मनोहरला अर्धवट कल्पना झाली व

त्याबरोबर त्याच्या सर्वांगावर एकदम झरदिशीं शहारे येऊन गेले. विस्मयातिशयानें तो रंगरावकडे पहात राहिला. एकदां त्याला वाटलें आपण तडक जिना उतरून परत निघून जावें. पण त्याचे पाय हालले नाहींत.

रंगराव आंतल्या स्त्रीस म्हणाला ‘ कोणतें काय ?–दार उघड.' त्याला ओळखतांच ‘इश्श् !—तुमची कां स्वारी ! ’ असें म्हणून ती स्त्री हंसली, व मग तिनें लगबगीनें दार उघडलें.

मनोहर रंगरावाच्या मागोमाग आंत शिरून खुर्चीवर बसला खरा, पण त्याचें रंगरावच्या बोलण्याकडे चित्त 'नव्हतें व गुलाब नायकीण मुरडत मुरडत एकीकडे बोलत होती व एकीकडे पट्ट्या तयार करीत होती तिकडेही त्याचें लक्ष नव्हतें. रानांतून पकडून आणून पिंजऱ्यांत टाकलेल्या पक्ष्याप्रमाणें त्याचें हृदय सारखें धडधडत होतें.

पण नवखेपणानें वाटलेलें भय नाहींसें व्हायला फारसा वेळ लागला नाहीं. गुलाबच्या अंगीं नायकिणीचें कसब पुरें होतें.

कांहीं वेळानें रंगरावानें गुलाबच्या कानांत कायसें सांगितलें. तें ऐकून ती हंसली व तिनें मनोहराकडे नेत्रकटाक्ष फेंकून मधुर हास्य केलें.

मग रंगराव मनोहराच्या अगदीं जवळ सरकला व त्यानें त्याच्या कानांत कांहींसें सांगितलें.

त्याबरोबर मनोहर एकदम दचकला, व एखादी विलक्षण कल्पना अनपेक्षितपणें कोणी सुचविली म्हणजे माणूस जसा धडकून जातो तसा तो झालेला दिसला. त्याच्या चेहऱ्यावरचें सारें तेज एकदम नाहींसें झालें.

पण लगेच त्याचें मन त्याला म्हणालें,

‘—बाकी, काय हरकत आहे ?—लक्ष्मीसारख्या मूर्ख मुलीशीं

माझी जन्माची गांठ पडल्यावर माझं सुख मला अशा रीतीनं मिळवलंच पाहिजे !—'

मनोहर मोहाला बळी पडला.

यानंतर पंधरा दिवस गेले, त्यांत कृष्णपक्षांतील अंधकाराप्रमाणें मनोहराच्या मनांतील विमोह वाढत गेला.

गुलाबच्या संगतीची त्याची आसक्ति बळावत गेली. तिच्या नानातऱ्हेच्या विलोभनांच्या जाळयांत तो सापडत चालला व तितक्या प्रमाणांत लक्ष्मीशीं कपटाचरण करण्यांत तो निर्ढावूं लागला. तो रोज बँकमधून निघाला कीं आधीं गुलाबकडे जाई, व घरीं उशीरा आल्यावर कांहीं तरी सबब सांगून लक्ष्मीची समजूत करी. लक्ष्मीची समजूत पटणें कठिण नव्हतें. तिला बिचारीला खऱ्या प्रकाराची कांहीं कल्पनाच नव्हती.

ज्या वेळीं मनोहर गुलाबशीं स्वैराचरण करण्यांत निमग्न असे त्यावेळीं ती घरीं पोथी वाचीत बसे व तो अजून का आला नाहीं म्हणून गॅलरींत येऊन पुन्हां पुन्हां रस्त्यावर दूरवर नजर टाकून पहात असे.

आपल्याकडे पतीनें पाठ फिरविली असेल अशी तिला शंकाही नव्हती व तशी पाठ फिरविण्यास आपला एक अगदीं गौण स्वभावदोष कारण झाला आहे याचीही तिला दाद नव्हती.

अति संशयखोरपणा वाईट ? पण जागरूकपणाचा सर्वस्वीं अभाव असणेंहि कांहीं कमी वाईट नाहीं.

कांहीं दिवसांनीं एकदां गुलाबकडे संध्याकाळच्या ऐवजीं रात्रीं जावयाचें मनोहरानें ठरविलें.

घरीं आल्याबरोबर तो लक्ष्मीला म्हणाला,

'लवकर वाढ, मला जेवून बँकेंत जायचें आहे.'

'रात्रीं ?' लक्ष्मीनें आश्चर्यानें विचारलें.

‘ हो. काम फार सांचलं आहे तेव्हां साहेबानं रात्रीं यायला सांगितलं आहे. काय करायचं ? ’

‘ जळला मेला तो साहेब ! ’ असें उद्गारून लक्ष्मीनें झटपट तयारी करून मनोहरचें पान वाढलें.

जेवण होतांच मनोहर तडक गुलाबच्या बिऱ्हाडीं गेला.

पण गुलाबची कळी त्या रात्रीं कांहीं उमलेना. ती अगदीं कोमजलेली दिसली. ती धड बोलेना चालेना सुद्धां.

मनोहरनें शेवटीं तिला जवळ ओढून व हातानें तिची हनुवटी वर करून विचारलें ‘ आज झालं आहे तरी काय ? ’

गुलाब नाट्यकुशल होती. चेहऱ्यावरचा उदासपणा अधिकच वाढवून खिन्न स्वरानें ती म्हणाली,

‘ मी मोठ्या संकटांत आहे—पण तुम्हांला सांगून काय उपयोग आहे ?—’

तिच्या नाट्याचा हवा तो परिणाम झाला. मनोहर म्हणाला, ‘ कां नाहीं उपयोग ? तुझं दुःख दूर करायसाठीं मी काय करणार नाहीं ?—’

‘ येवढं म्हणतां तेंच मला पुष्कळ झालं. तुम्हांला ज्यास्ती तसदी द्यायचं माझ्या जिवावर येतं ’ आपलें नाट्य पुरें करीत गुलाब म्हणाली, व तें म्हणतांना तिनें उसासा टाकला.

त्या उसाशाचा कर बरोबर लागला. तिला घट्ट हृदयाशीं धरून मनोहर म्हणाला “ नाहीं, नाहीं; आपलं दुःख तुला मी असं लपवूं देणार नाहीं. मला सांगितलंच पाहिजेस काय तें. ’

‘ थोडक्यांत सांगायचं म्हणजे उद्यांपर्यंत पांचशें रुपये उभे केले नाहींत तर मला अफू खाऊन जीव द्यावा लागेल. ’

“ काय ? म्हणतेस काय तूं ? ”

‘ खरंच. माझ्या गळ्याशपथ.’

‘ कांहीं फिकीर नाहीं. गुलाब, मी श्रीमंत नाहीं, पण तुझं दुःख दूर करण्यासाठीं मी स्वतःला गहाण ठेवायलासुद्धां तयार होईन हें लक्षांत ठेव. मी देतों तुला उद्यां पांचशें रुपये आणून. मग तर झालं ?—आतां चिंता सोड, अन् एकदां नेहमींसारखी हांस पाहूं.’

चतुर गुलाबनें त्याला मिठी मारली, व आपल्या जाळ्याचा शेवटचा धागा ताणून घट्ट केला.

घरीं गेल्याबरोबर मनोहरनें आपलें बँकबुक काढून पाहिलें. आपल्या खातीं २५० रुपये असल्याचें दिसतांच तो बुचकळ्यांत पडला.

गुलाबला द्यावयासाठीं आणखी २५० रुपये कोठून आणावयाचे ? अंथरुणावर पडल्यापडल्या त्यानें या प्रश्नावर विचार केला व शेवटीं एक युक्ति त्याला सुचली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा पितांना तो लक्ष्मीला म्हणाला ‘ काल बँकेच्या साहेबानं माझ्याजवळ पांचशें रुपये उसने मागितले.’

लक्ष्मी बरीचशी आश्चर्यचकित झालेली दिसली. ती म्हणाली ‘ इश्श ! या साहेबांना मेल्यांना येवढाले पगार असून पुनः अशीं कर्जे काढावीं लागतातच का ? ’

“ अग त्यांचे पगार मोठे तसे खर्चेही मोठे अवाढव्य असतात बेट्यांचे ! ’

‘ तें खरें. पण कुठले द्यायचे पांचशें रुपये ? ’

‘ हो, पण देतां आले तर फार चांगलं होईल. आतां साहेबाच्या नडीच्या वेळीं जर मजकडून त्याला रक्कम मिळाली तर माझं प्रमोशन मला खचित लवकर मिळेल. ’

‘ खरंच. ’ तें बोलणें पटून लक्ष्मी म्हणाली.

‘ बँकेंत आपले सारे २५० रुपये आहेत. ’

‘ मग कसं बरं ? ’

‘ माझ्या मनांत एक आलें आहे. सांगूं ? रागवायची नाहींस ?’

‘ हें काय विचारणं ? ’

‘ तुझे गोठ देत असलीस तर—’

‘ इश्श ! मग येवढं अगदीं चाचरायला कशाला हवं तें ? ’

असें म्हणून लक्ष्मीनें त्या क्षणीं गोठ काढून दिले.

मनोहरनें गोठ गहाण ठेवले व १५० रुपये उभे केले. पांचशेंच्या ऐवजीं चारशें रुपये गुलाबला दिले तरी आज पुरतील, बाकीचे पुढें देऊं असें त्यानें मनाशीं ठरविलें व तो घरीं आला.

मनोहर जेवत असतांना त्याला वाढता वाढतां एकदां मध्येंच लक्ष्मी म्हणाली ‘ मला थोडे पैसे हवे गडे.

‘ कशाला ? किती ? ’

‘ फार नकोत कांहीं. दहा रुपये पुरतील. आज अधिक आश्विन सरायचा नाहीं का ? मी अधिक महिनाभर एक व्रत केलं होतं त्याचं आज उद्यापन करायला हवं. ’

‘ तें ऐकतांच रागाच्या स्वरानें मनोहर म्हणाला,

‘ तुला उठल्या बसल्या वेडगळ व्रतवैकल्यावांचून दुसरं कांहीं सुचत नाहीं. पण पैसे आणावयाचे कुठले ? ’

त्यांचा राग पाहताच लक्ष्मी रडकुंडीस आली व आर्जवानें म्हणाली, आतां मी कधीं आधीं विचारल्यावांचून करायची नाहीं व्रत बीत कांहीं. पण जें केलं आहे त्यांची नीट सांगता नको कां बरं व्हायला ? ’

‘ तें कांहीं मला समजत नाहीं. मी दोन रुपये देईन तेवढ्यांत देवाला म्हणावं संतुष्ट हो. ’

आणि जेवण आटपून कपडे केल्यावर खरोखरच त्यानें दोन रुपये तिच्या आंगावर फेंकले, व तो बँकेंत चालता झाला. लक्ष्मी किती वेळ तरी तशीच अश्रू ढाळीत बसली.

बँकेमध्यें मनोहरचें लक्ष कामाकडे लागेना. आपण पांचशेंच्या ऐवजीं चारशेंच रुपये देणार तेवढ्यानें गुलाबचें संकट टळेल कीं नाहीं ? ती आज आपल्यावर सुप्रसन्न होईल, कीं पैसे कमी पडले म्हणून रुष्टच होईल ? ती रुष्ट झाली तर तिची समजूत कशी करायची ? खूप झाली तर प्रेमविलास कसे करायचे ? इत्यादि विचार त्याच्या मनांत सारखे घोळत होते.

या भ्रमिष्टपणामुळें त्यानें बँकेच्या लेजरबुकांत बेरजा भरतांना कित्येक चुका केल्या व एके जागीं तर स्वतःची सही करावयाच्या ऐवजीं गुलाब अशीं अक्षरें लिहून टाकलीं.

साहेबाच्यापुढें तीं लेजरबुकें गेलीं तेव्हां त्यानें संतापून पट्टेवाल्याकडून मनोहरास बोलावून आणलें, त्याची खूप खरडपट्टी काढली व पुन्हा असा हलगर्जीपणा केलास तर ताबडतोब हांकून देईन अशी ताकीद दिली.

बँकेंतून सुटताच मनोहरानें गुलाबचें घर गांठलें.

त्याच वेळीं त्याच्या बिऱ्हाडीं लक्ष्मी भटजींना म्हणत होती ‘ भटजी, मी पूजेची सारी तयारी केली आहे, पण वाणावर दक्षणा ठेवायला दोन रुपयापेक्षां अधिक नाहींत, चालेल कां ? ’

हें विचारताना तिला अगदीं गहिंवर आला. मनोहराचें बोलणें व दोन रुपये आपल्या अंगाकर फेंकतांना त्यानें केलेली मुद्रा तिला आठवली, व त्या आठवणीनें आलेला दुःखाचा हुंदका तिनें मोठ्या कष्टानें आवरला.

‘ हें काय विचारणं, वहिनी ?–तुम्ही अशा कां अगदीं रडकुंडीस आलांत ? दोन रुपये चालतील कां विचारतां ? मुळींच नसले तरी चालतील. समजलांत ? तुम्ही अगदीं हें करूं नका अन् अगदीं आनंदी मनानं पूजा सांगतों तशी करा. अहो देव भावाचा भुकेला ! ’

भटजीचे ते सहानुभूतीचे उद्गार ऐकून लक्ष्मीला आपला हुंदका अधिकच अनावर झाला.

तिकडे गुलाबच्या बिऱ्हाडीं मनोहर पोंचल्यावर ती प्रथम त्याच्याशीं मोठ्या प्रेमानें बोलली. पण कांहीं वेळानें त्यानें खिशातल्या ४०० रुपयांच्या नोटा काढून हातीं दिल्या व आणखी 'आज मला जमवितां आले नाहींत. माफ कर' असें म्हटलें त्याबरोबर तिची चर्या व वागणूक एकदम बदलली. तिनें कपाळाला आंठ्या घातल्या, भुंवया चढविल्या व बोलणें बंद केलें.

मनोहरनें तिची नानाप्रकारें मनधरणी केली, पण तिची मुद्रा प्रसन्न होईना व शेवटीं तर ती उठून आंतच गेली.

मनोहरास अगदीं विरघळल्यासारखें झालें. गुलाब जरा वेळानें बाहेर येईल असें त्याला वाटलें; पण दोन घटका झाल्या तरी ती आली नाहीं तेव्हां त्याला मोठें कोडें पडलें. गुलाबच्या त्या वर्तनाचा त्याला अर्थच कळेना.

शेवटीं आपणच आंत जाऊन तिची समजूत करावी अशा विचारानें तो उठला.

पण तो आंतल्या दालनाच्या दाराशीं जातो तोंच मागून कोणीसें त्याला हटकलें,

'आंत जायचं नाहीं हो—'

मनोहरानें वळून पाहिलें तों गुलाबच्या माडीवर त्याला कधीं कधीं दिसलेला एक कळकट, राठ, तिरळा तबलजी तेथें उभा होता.

मनोहर म्हणाला 'कां ?'

'कां म्हणजे !' तो कळकट तिरळा विचित्र हंसून म्हणाला, 'मी सांगतों म्हणून—'

त्याच्या त्या उत्तराचा मनोहरला राग आला. तो म्हणाला.

'मी जाणार' व त्यानें दरवाजा अर्धवट ढकलला तों कोणा

तरी गृहस्थाच्या बाहुपाशांत कोचावर पडलेली गुलाब त्याला दिसली !

आश्चर्य व संताप यांचा असा कांहीं धक्का त्याला बसला कीं त्याचा दारावरचा हात सुटला, व दार पूर्ववत् बंद झालें.

संतापाच्या भरांत मनोहरानें गुलाबला मोठमोठयानें शिव्या द्यावयास प्रारंभ केला.

एवढ्यांत त्या तिरळ्या तबलजीच्या जवळ आणखी कोणी तरी एक तसाच गलिच्छ आणि क्रूर चेहऱ्याचा इसम येऊन उभा राहिला होता.

ते दोघे इसम मनोहराच्या जवळ आले व त्याला दरडावून म्हणाले—

‘ तोंड आटपून मुकाट्यानें खालीं होतोस कीं नाहीं ? ’

मनोहर त्वेषाच्या ऐन भरांत होता. त्यानें गुलाबबरोबर त्यांनाहि शिव्या हंसडल्या व पोलिस बोलावण्याची दहशत घातली. तें ऐकतांच—

‘ आम्ही पोलिसांचे बाप लागून गेलों आहोंत ! ’

असें म्हणत त्या दोघांनीं मनोहरास एकेक दंडानें धरलें, हाणमार केली, त्यांच्या बोटांतली आंगठी व मनगटावरचें घड्याळ हिसकून काढून घेतलें, व त्याला जिन्याखालीं ढकलून दिलें.

* * *

घरीं लक्ष्मीची पूजा केव्हांच आटोपली होती व देवासमोर बसून आज मनोहरास येवढा उशीर कां झाला अशी काळजी करण्यांत ती चूर झाली होती.

मनोहर घरीं आला तों त्याचे कपडे ठिकठिकाणीं फाटलेले, केस अस्ताव्यस्त झालेले व उजव्या गालाची बाजू रक्तानें किंचित् डागलेली होती.

तें पाहतांच लक्ष्मी एकदम किंकाळी फोडून उठली, व एखाद्या वेलीसारखा हेलावणारा त्याचा देह प्रेमभरानें सावरीत म्हणाली,

‘ काय झालं ?—कुठें गाडीचा धक्का बिक्का कां लागला ?—’

मनोहर कांहींच बोलला नाहीं, तो फक्त लहान मुलासारखा रडूं लागला.

लक्ष्मीला वाटलें त्याला वेदना होत असतील व त्यामुळें तो बोलत नसेल.

म्हणून मग त्याला अधिक कांहीं न विचारता ती त्याची परिचर्या करावयास लागली. तिनें त्याचे कपडे काढले, त्याची जखम धुतली व त्याला अलगद अंथरुणावर निजविलें.

मग गरम दुधाचा एक पेला तयार करून आणून ती पलंगाच्या कडेशीं उभी राहिली व म्हणाली,

‘ आधीं हें थोडं दूध घ्यावं. जेवायचीं पानं मांडतेंच मी. ’

मनोहरानें हात पुढें केला.

पण तेवढ्यांत लक्ष्मीला घेरी आली, दुधाचा कप तिच्या हातून गळून पडला, आणि ती धाडकन जमिनीवर पडली.

मनोहर चटकन् उठून पलंगावरून उतरला. त्यानें तिचें मस्तक मांडीवर घेतलें व वारा घालण्यास प्रारंभ केला.

कांहीं वेळानें लक्ष्मीनें डोळे उघडले तेव्हां मनोहरानें विचारलें—

‘ आतां बरं वाटतं आहे ना !—अशी कशी एकदम घेरी आली तुला ? ’

‘ आपल्याला कष्ट झाले, क्षमा करावी. पण आज दिवसभर मी निर्जळा उपास केला आहे, आज संध्याकाळीं पूजेनंतर उपास सुटायचा होता. पण—पण–आपली वाट पहात बसलें—’

मनोहराच्या अंतःकरणांत विलक्षण कालवाकालव झाली.

‘ अरेरे ! ’

असा उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडला, व क्षणभर लक्ष्मी-कडे निरखून पाहून त्यानें विचारलें !

‘ कशासाठीं करतेस हे उपास तापास ?

‘ दुसऱ्या कशासाठीं ?—आपल्या कल्याणासाठीं ! ’

तें ऐकून मनोहरास विलक्षण गहिंवर आला. तिला हृदयाशीं घट्ट धरून हुंदके देत तो म्हणाला,

‘ लक्ष्मी, लक्ष्मी ! मला क्षमा कर ! मी भयंकर अपराधी आहें ! लक्ष्मी मला क्षमा कर ! ’

लक्ष्मीला या बोलण्याचा कांहींच अर्थ कळेना. त्याची ती चमत्कारिक मुद्रा पाहून ती भांबावून गेली,

त्याच्या डोळयांतून वाहणाऱ्या अश्रूंनीं त्याच्या अंतःकरणाला जडलेला केवढा दुष्ट मोह धुंवून जात होता त्याची तिला बिचा-रीला कल्पनाही नव्हती !

* * *

बरोबर एक महिन्यानें अश्विनी आमावास्या आली.

सकाळीं लक्ष्मी मनोहरास म्हणाली,

‘ संध्याकाळीं लक्ष्मीपूजन करायचं आहे अं ! भटजींना साडे-सातला बोलावलें आहे मीं. ’

‘ भटजींचं–काय कारण ? ’

‘ इश्श्‌ हें काय—? ’

‘ खरं लक्ष्मीपूजन एकांतांतच होतं. ’

म्हणजे ?—’

पण तिचा तो प्रश्न पुरा उच्चारलाही गेला नाहीं तोंच तिचें तोंड मनोहरानें बंद केलें व म्हटलें,

‘ हेंच माझं खरं लक्ष्मीपूजन ! ’

( किर्लोस्कर, नोव्हेंबर १९३० )

# अपुरी गोष्ट ६

[ ता. १२ जुलई रोजीं मुंबई रेडिओवर सांगितलेलें गोष्टीचें १ लें प्रकरण. ]

त्या एका क्षणांत रघुनाथच्या मनाची सारी प्रसन्नता पार मावळली अन् आश्चर्याचा धक्का खाऊन दुर्बल झालेलं त्याचं मन विचार करूं लागलं, आतां पुढें ?

त्याच्या खिशांतलं पाकीट नाहींसं झालं होतं, अन् नुकत्याच खाल्लेल्या फर्मास आइस्क्रीमचे पैसे दिल्यावांचून दुकानाबाहेर तरी कसं पडायचं हा विचित्र प्रश्न त्याला सगळ्यांत आधीं सोडवणं भाग होतं.

एखादी वस्तू हरवली म्हणजे पुढच्या गोष्टीचा विचार करण्यासाठीं माणसानं आपलं मन कितीहि दामटलं तरी तें पुन्हां पुन्हां मागं वळतं, अन् ती वस्तु हरवली तरी, कशी, कुठं आणि केव्हां हेंच ठरविण्यांत घोंटाळत राहतं. रघुनाथची अशीच स्थिति झाली. आपण कुठें कुठें गेलों अन् केव्हां केव्हां पैशाचं पाकीट खिशांतून बाहेर काढलं याची तो आठवण करून पाहूं लागला. दुपारीं तो किल्ला पाह्यला गेला होता. तेथें त्यानें एका आंधळ्या फकिराला एक आणेली दिली होती. किल्ल्याच्या दरवाजापाशीं झनानाबादच्या देखाव्यांचीं छापील कार्डें एक इसम विकीत होता त्यांतलीं चार त्यानं विकत घेतलीं होतीं. घरीं मुंबईस बायकोला

लिहिण्यासाठीं त्यांतलं एक त्यानं लगेच वापरलं होतं. " जोधपुरास हिशेबतपासणीचं काम संपविल्यावर सरळच येणार होतों. पण वाटेंत झनानाबाद पाहण्यासारखं आहे असं पुष्कळांनीं सांगितलं तेव्हां म्हटलं पहावं. रेल्वे कंपनीच्या खर्चानं या बाजूला पुन्हां केव्हां यायला मिळेल त्याचा काय नेम ? इथें काल आलों. उद्यां रात्रीं इथून निघेन. छान टुमदार आहे गांव. सगळी वस्ती मुसलमानांची. इंजीनिअर खात्यांत एक दक्षिणी गृहस्थ आहेत तेवढेच हिंदू असं ऐकतों. माझी प्रकृत्ति उत्तम आहे. " मग कार्डाला तिकीट लावून टाकायसाठीं तो पोस्ट ऑफीसपाशीं उतरला होता. तिथून बाजारांत गेल्यावर त्यानं टांगा सोडून दिला होता. टांगेवाल्याला पैसे देऊन खिशांत पाकिट परत ठेवल्याचं त्याला पक्कं आठवत होतं. त्यानंतर मात्र आतांच पैसे काढायची वेळ त्याला आली होती, अन् आतां पाकीट नाहींसं झाल्याचं त्याला आढळून आलं होतं. अर्थात् बाजारांत हिंडत असतां कुणीतरी पटाइत उचल्यानं त्याला प्रसाद दिला असला पाहिजे. झनानाबादच्या किल्ल्याची अन् तलावाची जशी त्यानं कीर्ति ऐकली होती तशाच तिथल्या खिसेकापूंच्या अन् उचाल्यांच्या गोष्टीही प्रवासांत एका बडबड्या मुशाफिरानं त्याला सांगितल्या होत्या. त्यांची सत्यता आपल्याला लवकरच पटणार आहे याची त्याला कुठून कल्पना त्या सुरस चमत्कारिक गोष्टी ऐकतांना !...

रघुनाथनं पुन्हां एकदां कोटाचे, शर्टचे, हाफ पँटचे सारे खिसे तपासले, हातांत वागविण्याची छोटी बॅग उघडून तिच्यातलं सारं सामान सुद्धां उस्कटून पाहिलं, पण छे ! पाकिटाचा पत्ता नाहीं !...

त्यांत दहा दहा रुपयांच्या तीन नोटा होत्या, दोन अडीच रुपयाचं नाणं होतं, अन् रेल्वे कंपनीचा फुकट प्रवासाचा पास होता. तो पास अन् सारी रोकड नाहींशी झाल्यावर तो आतां

मुंबईंत जाणार कसा ? आणि आइस्क्रीमचे दोन आणे तरी आत्तां देणार कुठले ? त्याची आई त्याला हजारदां म्हणाली होती, ' शोभेसाठीं नको असली तरी तुला अडीअडचणींत उपयोगी पडेल म्हणून तोळाभराची कां होईना आंगठी करून घाल हातांत.' तिचं तें म्हणणं आपण ऐकलं असतं तर या वेळीं आपण असे फिकिरींत पडलों नसतों असं रघुनाथच्या मनांत आलं. एक चांगलंस रिस्ट वॉच घेण्याबद्दल त्याच्या बायकोनं त्याला कितीदां तरी आग्रह केला होता. तो न ऐकल्याबद्दलही त्याला पश्चात्ताप झाला. तो मनाशीं म्हणाला आतां मुंबईस गेल्याबरोबर आंगठी अन् रिस्ट वॉच दोन्ही खरेदी करायची. पण लगेच त्याच्या मनांत आलं, मुंबईला गेल्यावर या गोष्टी करायच्या हें ठीक आहे, पण आधीं मुंबईला कसं जायचं, ज्या हॉटेलांत तो दोन दिवस राहिला होता त्याचं बिल कसं भागवायचं अन् या आइस्क्रीमच्या दुकानांतून बाहेर कसं पडायचं हे प्रश्न सोडविले पाहिजेत !...

त्यानं खिशांतून सिगारेटची डबी काढली. दोनच सिगारेट्स शिल्लक होत्या. आणखी विकत घ्यायला त्याच्याजवळ दिडकीसुद्धां नव्हती. क्षणभर त्याला वाटलं, त्या दोन सिगारेट्स असूं द्याव्या शिल्लक. पण पुन्हां त्याच्या मनांत आलं, पुढें काय व्हायचं असेल तें होईल, आत्तांची तल्लफ का मारायची ? त्यानं एक सिगारेट पेटवली, अन् धूर सोडीत तो विचार करूं लागला, आतां कसं करावं ?...

सिगारेट संपली तरी त्याचे विचार संपले नव्हते. त्याच्या मनांत आलं, असंच किती वेळ बसून राहाणार आपण या दुकानांत ?...

तितक्यांत दुकानापुढें एक मोटार थांबली व दोन इसम आंत येऊन एका टेबलाजवळ बसले. त्या दोघांपैकीं एक दाढीवाला मुसलमान होता, अन् दुसरा धोतर नेसला होता. अर्थात् तो हिंदू

असला पाहिजे. कदाचित् झनानाबादला इंजीनियरखात्यांत जे दक्षिणी गृहस्थ आहेत म्हणतात ते हेच असतील असं रघुनाथच्या मनांत आलं. तो आपल्या जागेवरून उठला, व त्या गृहस्थांजवळ जाऊन म्हणाला, ' नमस्कार. '

त्या गृहस्थानं चटकन् नमस्कार करून विचारलं ' आपण दक्षिणी दिसतां ? '

' होय. '

' मग फार आनंदाची गोष्ट आहे तर ? ' ते गृहस्थ म्हणाले, ' बसा, आइस्क्रीम घ्या आमच्याबरोबर. '

" घेतलं आहे मी आत्ताच. "

" पण आणखी. आमचं म्हणून. '

' जें मी घेतलं तेंच तुमचं म्हणायची वेळ आली आहे. '

' म्हणजे काय ? '

' सांगतों, ' असं म्हणून रघुनाथ खुर्चीवर बसला. अन् मग त्यानें आपल्यावर ओढवलेल्या विचित्र प्रसंगाची हकीकत त्यांना सांगून टाकली.

त्यांचं बोलणं संपल्यावर त्या गृहस्थानीं विचारलं, ' पण यात एखादं मोठं संकट ओढवल्यासारखं कां वाटतं तुम्हाला ? '

रघुनाथ म्हणाला, ' संकट नाहीं तर काय ? इथें परमुलुखात मी आलेला. कुणाची ना ओळख ना देख. अन् एकदम जवळ दिडकी सुद्धां नाहीं अशी माझी अवस्था झालेली. घरून तारेनं पैसे मागवितां येतील मात्र. पण मधांशींच माझ्या लक्षात आलं, उद्यां रविवार म्हणून अन् परवां बादशहांचा वाढदिवस म्हणून पोस्ट बंद असणार. म्हणजे घरचे पैसे येईपर्यंत दोन दिवस रखडावं लागणार मला. इथं निष्कांचन अवस्थेंत ही गोष्ट मला संकटासारखी वाटेल नाहीं तर काय तुम्हींच सांगा. '

इतका वेळ त्या दोघांचं बोलणं प्रयत्नानं समजून घेत बसलेला तो मुसलमान गृहस्थ रघुनाथला म्हणाला, ‘ संकटासारखी वाटली असती असं म्हणा; पण आतां या बाळासाहेबांची गांठ पडल्यावर कसलं आलं आहे संकट ! हे कोण तुम्हाला माहीत नसेल. इथल्या इंजीनिअरखात्यांतले बडे ऑफिसर आहेत. यांची—’

‘ वाटलंच मला ’ रघुनाथ हंसून म्हणाला, ‘ म्हणून तर मी आपण होऊन जवळ येऊन नमस्कार केला यांना. ’

तितक्यांत नोकरानं आइस्क्रीमच्या बशा आणून टेबलावर मांडल्या, तेव्हां बाळासाहेब म्हणाले, ‘ बऽऽरं, आतां काळजी सोडा सारी, अन् मारा या मलईवर ताव. मला मुंबईपुण्याचा खूप अभिमान आहे. पण असं शेवया घातलेलं सुंदर आइस्क्रीम तुम्हांला तिकडे मिळतं का सांगा. ’

‘ नाहीं खरंच. ’ रघुनाथ म्हणाला, ‘ मीं कवि असतों तर झनानाबादच्या आइस्क्रीमवर एक सुंदर सुनीत करून मराठी वाचकांना गार करून टाकलं असतं. ’

बाळासाहेब मोठमोठ्यानें हसले, व म्हणाले, ‘ आमची मंजू हवी होती तुमची ही कोटी ऐकायला. ’

‘ मंजू म्हणजे आपली लेक वाटतं. ’

‘ लेक नाहीं पण लेकी सारखीच आहे. मला स्वतःला मूलबाळ नाहीं. तेव्हां आमच्या बायकोच्या भाचीलाच आम्ही मुलीसारखं मानतों. मुंबईला शिकायला असते. सुटींत इकडे आली आहे. अशी बडबडी आहे म्हणतां कीं कांहीं पुसतां सोय नाहीं. ’

‘ होय कां ? ’

‘ दिसेलच तुम्हांला आतां. कारण तुमची हकीगत ऐकल्या-पासून मी मनाशीं काय योजलं आहे ठाऊक आहे ? ’

‘ काय ? ’

'तुमचं बाडबिछायत हॉटेलातनं हालवायचं अन् तुम्हाला आमच्या बंगल्यावर घेऊन जायचं. आमच्या बंगल्यावर तुम्ही खुष व्हाल कीं नाहीं बघा.'

बाळासाहेबांचे हे उद्गार खोट्या प्रौढीचे नव्हते हें मग थोड्याच वेळांत रघुनाथच्या लक्षांत आलं. झनानाबादचा जो तलाव त्यानं आदल्या दिवशीं पाहिला होता त्याची देखरेख बाळासाहेबांकडे असल्यामुळें तिथला सरकारी बंगलाच त्यांना राह्यसाठीं मिळाला होता. बंगल्याच्या व्हरांड्यांत उभं राहतांच उजव्या हाताला तलावाच्या प्रचंड जलविस्ताराची संध्याप्रकाशांतली जी शोभा दिसली ती पाहून, अन् पश्चिमेकडच्या गार वाऱ्याचा जो झोत अंगावरून गेला त्यानं प्रफुल्लित होऊन तो उद्गारला,

'वा ! बहोत अच्छी !'

आणि नंतर रात्रीं जी खोली त्याला झोंपण्यासाठीं दिली होती तिच्या खिडकीशीं बसून चांदण्याच्या शुभ्र प्रकाशानं चंदेरी झालेलं, अन् छोट्या छोट्या लाटांच्या मंदध्वनीनं गुजगोष्टी करणारं तलावाचं पाणी टक लावून बघत त्यानं कितीतरी वेळ घालविला. तो अखेर उठला तेव्हां बंगल्यांत सामसूम झाली होती. अंथरुणावर अंग टाकल्याबरोबर त्याला गाढ झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नोकरानं त्याच्या खोलींत चहा आणला. तेव्हां त्यानं त्याला विचारलं,

'मी एकट्यानंच चहा घ्यायचा ? साहेब कुठं आहेत ?'

नोकर म्हणाला, 'साहेबांना पहाटेच जावं लागलं. ही चिठी दिली आहे त्यांनीं आपल्याला.'

बाळासाहेबांनीं चिठींत लिहिलं होतं, 'इथून एकशें तीस मैलांवर मोठ्या पुलाचं काम चाललं आहे. तिकडे तपासणीचं अकस्मात् निघाल्यामुळें मला जावं लागतं आहे. मी मंगळवारीं

येतोंच. पण आलों नाहीं तर माझी भेट झाल्याखेरीज तुम्ही जातां कामा नये. मी असा गेलों म्हणून रागावूं नये. आपलं घर समजून रहा. मंजू तुमची उत्तम बरदास्त ठेवील अशी मला खात्री आहे.'

'असं होय ? ठीक. असं पुटपुटून रघुनाथानं कपांत चहा ओतायसाठीं केटली उचलली. त्याचा चहा घेऊन होतो न होतो तोंच मंजू खोलींत आली. तो हंसला तेव्हां तिनं विचारलं,

'चहा बरा झाला होता का ?'

रघुनाथ म्हणाला, 'उत्कृष्ट'

मंजू नोकराकडे वळून म्हणाली, 'हें रे काय, सिगरेटचा डबा नाहीं आणलास ? तिकडे दिवाणखान्यांत रेडिओच्या मेजावर आहे बघ. आण लवकर.'

नोकरानं डबा आणून ठेवला तेव्हां रघुनाथानं तो सहज उचलून त्यावरचा छाप पाहिला. मंजूनं हंसत विचारलें.

'या चालतील ना ? बाळासाहेब नेहमीं या ओढतात. पण चालत नसतील तर नोकराला गावांत पाठवून दुसऱ्या कोणत्या हव्या असतील—'

रघुनाथ गडबडीनं म्हणाला, 'नको नको. या छान आहेत. मी तर याच्यापेक्षां हलक्याच ओढतों नेहमीं !'

मंजू हसली व म्हणाली, होय ? लेखकांना काय आवडेल त्याचा नेम नाहीं म्हणतात तें खरंच तर !'

तिच्या त्या बोलण्याचा रघुनाथला नीटसा बोध झाला नाहीं. लेखकांच्या लहरीचा दाखला तिनं कां दिला ? तिला विचारावसं त्याच्या क्षणभर मनांत आलं. पण त्याला वाटलं, बोलली असेल ती काहीं तरी. त्यानं सिगरेट डब्यांतून काढली अन् पेटवली.

जरा वेळ गप्प राहून मंजू म्हणाली, 'बाळासाहेबांनीं माझ्यावर भलतीच जबाबदारी टाकली आहे.'

' कोणती ? '

' तुमच्यासारख्या प्रख्यात लेखकाची बरदास्त ठेवायची सोपी का आहे ही गोष्ट ? '

आतां रघुनाथला विचारणंच भाग होतं. तो म्हणाला, ' तुमच्या म्हणण्याचा अर्थ कळला नाहीं मला. मी प्रख्यात लेखक आहें असं कुणी सांगितलं तुम्हाला ? '

मंजू म्हणाली, सांगायला कशाला हवं ? मीं फोटो पाहिले आहेत तुमचे. तुमची नवी कादंबरी माझ्याजवळ आहे. तिच्यात फोटो आहे तुमचा ! '

रघुनाथला एकदम आठवण झाली. पुष्कळदां त्याचे मित्र त्याला म्हणत, " प्रसिद्ध कादंबरीकार रजनीकान्त बापट यांच्या अन् तुझ्या चेहऱ्यांत भारी साम्य आहे बघ. तो त्यांना म्हणे, ' बरं झालं कीं एका मोठ्या माणसासारखी बुद्धि अन् कीर्ति नसली तरी त्याच्या सारखे आपले नाक डोळे आहेत. हें समाधान काहीं थोडं नाहीं. "

तो मंजूकडे पाहून हंसला अन् म्हणाला, ' तुम्ही फसलात म्हणायच्या. पण मी खरंच कादंबरीकार बापट नव्हे. '

मंजू मान वेळावून म्हणाली.

' हं, खरंच जसं कांहीं ! '

' आतां काय सांगावं ? '

मंजु म्हणाली, ' तुमच्या बॅगवर आर्. एम्. बी. असं नांव आहे तें पाहिलं मी कालच. रजनीकान्त माधव बापट. '

रघुनाथ म्हणाला, ' अहो माझ्या नांवाचीं आद्याक्षरं तींच आहेत एवढंच. माझं नांव रघुनाथ मोरेश्वर भडभडे ! '

' हो हो ! आणखीन् नाहीं कां कांहीं ! '

' मी जी. आय. पी. च्या ऑफिसांत अकाउंटंट आहे. '

'तुम्ही काय विमा कंपनीचा एजंट म्हणून सुद्धां सांगाल ?'

रघुनाथ उठला, अन् कोटाच्या खिशांतून आपलं व्हिजिटिंग कार्ड काढून तिच्या पुढें धरून म्हणाला,

'हें पाहिलंत कां माझं कार्ड ? आतां तरी ठेवाल विश्वास माझ्यावर ?'

मंजू मान हालवून म्हणाली शक्यच नाहीं. नुक्तंच तुमचं जें चरित्र प्रसिद्ध झालं आहे त्यांत वाचलं आहे मी कीं दुसऱ्याचं नांव धारण करून परमुलखांत हिंडायची फार हौस आहे तुम्हाला ! बंगाली नांव घेऊन अन् बंगाली पोषाख करून गोव्याची सफर करून आलांत तुम्ही !'

'मी ? झाऽऽलं. गोवं काळं कां गोरं माहित नाहीं मला अजून.'

'त्या बंगाली नांवापैकींच आतांचं हें भडभडे नांव दिसतं आहे. अन् काय म्हणे जी. आय्. पी.च्या ऑफिसांत अकाउंटंट ! सुचतात तरी कशा या युक्त्या ? पण मी फसणार नाहीं हं तुम्ही रजनीकांत बापट आहांत याबद्दल माझी पक्की खात्री आहे, अन् तुम्ही योगायोगानं आमच्याकडे आलां आहांत त्याचा भरपूर फायदा करून घ्यायचं मी मनाशीं ठरवलं आहे.'

'ही मोठी पंचाइत झाली म्हणायची !' असं म्हणून रघुनाथ मोठ्यांदा हंसत सुटला.

हंसणं ओसरल्यावर तो म्हणाला, 'तुमच्याशीं वाद घालायची सोयच ठेवली नाहीं तुम्हीं. मी बापट नाहीं असं सिद्ध करायसाठीं जो जो पुरावा मी काढीन त्याचा मुळीं तुम्हीं उलटच अर्थ करणार. मी मुद्दाम नांव बदललं आहे असं गृहीत धरल्यावर बोलणंच खुंटलं सगळं. तेव्हां तुमचंच म्हणणं खरं मानूं या. इथें तुमच्या घरीं मी आहें तोंपर्यंत मी रजनीकान्त बापट आहें असंच समजल्यावांचून माझी जर सुटका नसेल तर मी तरी जास्त आढेवेढे

कशाला घेऊं ? पाहूं तरी दोन दिवसांपुरतं एका प्रसिद्ध कादंबरी-काराचं सोंग घेण्यांत काय मजा असते ती ? मी रजनीकान्त बापट आहे, मग काय तुमचं म्हणणं आहे ? '

तें ऐकून मंजू हंसत सुटली. ती म्हणाली, ' असं चिडून काय बोलता ? सोंग उघडकीला आलं म्हणून रागावलांत वाटतं ? '

रघुनाथ म्हणाला, ' कमाल आहे बुवा तुझ्यापुढें ! मी रजनीकान्त आहे किंवा नाहीं हा प्रश्न राहूं दे, पण येवढं मात्र खचित, कीं माझ्याऐवजीं खरोखरच स्वतः रजनीकान्त तुझ्या घरीं आलेला असता तर तुझं स्वभावचित्र आपल्या एखाद्या कादंबरींत रंगविण्यासारखं वाटलं असतं त्याला. '

मंजू म्हणाली, ' मग घाला कीं माझं चित्र पुढच्या कादंबरींत. ' स्वप्नमंदिर ' नावाची कादंबरी लिहिणार आहांत ना आता ? परवांच वाचलं मी कुठेसं. रंगवितां माझ्यासारखी नायिका त्या कादंबरींत ? तुमची इच्छा असेल तर माझी ना नाहीं. इतकंच काय. तुम्हाला कल्पना नाहीं अशी मदत करूं शकेन मी तुम्हाला. '

रघुनाथनं चटकन् विचारलं, ' ती काय ? '

आणि त्याबरोबर मंजू हंसून म्हणाली, ' बघा तुम्ही किती चटकन् विचारलंत काय म्हणून. लेखनाला उपयोगी सामग्री मिळण्याचा संभव दिसल्याबरोबर तुमच्यातला खरा कादंबरीकार कान टवकारून जागा झाला. ' ' कसं पकडलं एका माणसाला ! ' असं म्हणून तिनं टाळ्या वाजविल्या.

रघुनाथला हसावं कां रडावं तेंच कळेना. तो मग कांहीं वेळ गप्प राहिला व नंतर त्यानं निराळाच विषय काढला.

मात्र दिवसभर त्याच्या मनांत सारखं येत होतं. एका प्रसिद्ध कादंबरीकाराला ही पोरगी मदत करणार म्हणते याचा अर्थ तरी

काय ? एखादी विलक्षण घटना आहे कीं काय हिच्याजवळ सांगण्यासारखी ?

...शेवटीं संध्याकाळीं त्याला राहवेना, त्यानं तिला म्हटलं,

' सकाळीं तूं बोललीस तें तितकंच राहिलं. '

तिनं विचारलं, ' काय तें ? '

' रजनीकान्तांना कादंबरी लिहिण्यांत तूं मदत केली असतीस म्हणजे काय ? '

ती म्हणाली, ' असं आडून नाहीं, नीट सरळ विचारा. '

तो हंसला व म्हणाला, ' अरे खरंच मीच रजनीकान्त आहे हें विसरलोंच मी. हं सांग, मला कशी मदत करणार आहेस तूं ? '

' तुम्हांला मनापासून हवी असेल तर करीन. '

' खरंच हवी आहे. '

मंजू कांहीं वेळ खालीं पहात राहिली, व म्हणाली, ' माझी स्वतःचीच हकीकत सांगणार आहें मी तुम्हाला. ती तुम्हाला कादंबरींत घालण्यासारखी वाटेल. '

रघुनाथचं चित्त अधिकच वेधलं गेलं. तो म्हणाला, ' मग सांग तर. '

' ती म्हणाली, ' या सुटींत इकडे मावशींकडे मी येणार नव्हतें. मुंबईसच राहणार होतें पण सुटीच्या पहिल्याच दिवशीं माझं अन् विनायकचं कडाक्याचं भांडण झालं. '

' विनायक कोण ? '

' विनायक होय ? अं...अं...तो माझा...त्याचं अन् माझं एकमेकांवर फार प्रेम होतं. होतं म्हणजे त्याच्यावर माझं अजूनहि आहे. पण त्याचं नाहीं. नाहीं म्हणजे नाहीं अशी खात्री नाहीं माझी पण नसल्यासारखं तो माझ्याशीं वागला. '

हे शेवटचे शब्द तिच्या ओंठाबाहेर पडले तोंच तिला हुंदका आला, व तिच्या डोळयांवाटे अश्रू ओघळूं लागले. ती कांहीं वेळ स्तब्ध राहिली. रघुनाथलाहि काय बोलावं तें सुचेना. तो मनांत-ल्यामनांत आश्चर्य करूं लागला, या मुलीच्या तोंडून आपल्याला आतां कळणार आहे तरी कसली चमत्कारिक प्रेमकथा ?

[ या लघुकथेचा विस्तार व शेवट कसा करतां येईल तें ठरवि-ण्याची खटपट केल्यास वाचकांच्या हातून ललित कथालेखनाचा अभ्यासच सहजासहजीं होण्यासारखा आहे, म्हणून ही " अपुरी गोष्ट " जेवढी व जशी प्रो. फडके यांनीं रेडिओवर सांगितली तशी छापली आहे. ]

# पहिली भाऊबीज : : ७

वरच्या छताला टांगलेल्या विजेच्या पंख्यामुळें चंद्रकांताचे केस विसकटून भुरुभुरु हालत होते, आणि एका घटकेपूर्वी घडलेल्या एका प्रसंगामुळें त्याच्या मनांतल्या सुखदुःखाच्या कल्पनाही पार विसकटून जाऊन हालत होत्या.

केसांच्या बटा डाव्या हातानें आवरून तो मधून मधून नीटनेटक्या करी; परंतु मनांतल्या विसकटलेल्या कल्पना तशा हातानें थोड्याच नीटनेटक्या करतां येणार ?

या नाइलाच्या जाणिवेनें चंद्रकात मध्येंच त्रासिक चर्या करी, हॉटेलमध्यें शिरतांच त्यानें दिलेल्या हुकुमाप्रमाणें परिचारकानें थंड पेयाचा ग्लास पुढें आणून ठेवला होता, त्यांतील एखादा घोंट घेतल्यासारखा करी, सिगारेटचा झुरका मारी, आणि कोंपऱ्यांतला परिचारक आपल्याकडे अजूनही कुतूहलानें दृष्टी लावून उभा आहे कीं काय, तें पाही.

कधीं असें होतें कीं, एखाद्या मनुष्याला वाटत असतें, आपल्याला या आयुष्यांत दुःख, संकटें, चिंता याखेरीज कांहीं मिळायचेंच नाहीं. पण अचानक असा कांहीं तरी एक अनुभव त्याला येतो कीं त्यामुळें त्याला वाटूं लागतें, अरे ! आपण उगीच स्वतःला सर्वस्वी अभागी समजत होतों !—आपल्याही जीवितांत सुखाचा व आनंदाचा अमुक एक भाग आहे !

उलट, असेंही कधीं कधीं होतें, कीं आपण पूर्ण सुखी आहोंत, आपल्या आयुष्यांत कोठल्याही सुखाची कमतरता नाही अशा समजूतींत असलेल्या माणसाच्या अकस्मात् ध्यानांत येतें, कीं अरे! आपण भ्रमांत होतों! अमुक एका बाबतींत इतर माणसांना जें सुख आहे तें आपल्याला नाहीं!

चंद्रकांताच्या बाबतींत आज ही दुसरी तऱ्हा झाली होती, आणि त्यामुळेंच त्याच्या मनांतल्या साऱ्या कल्पना विसकटल्या-सारख्या होऊन त्याचें नेहमीचें समाधान लोपलें होतें. त्याच्या आवडीचें पेय समोर असूनही तो तें एक एक घोट—जणूं नाइ-लाजानें घेत होता.

आजपर्यंत—नव्हे, एका घटकेपूर्वीपर्यंत चंद्रकांताची समजूत होती कीं, आपल्या सुखांत कांहीं देखील उणें नाहीं.

आणि ती वावगी थोडीच होती! लहानपणापासून त्याच्या पित्यानें त्याचें लालनपालन अतिशय प्रेमानें व पाण्यासारखा पैसा खर्च करून केलें होतें. त्याला आपल्या पित्याखेरीज नात्याचें असें कोणींच नव्हतें. पांच वर्षांपूर्वी त्याचा पिता वारला तेव्हां जवळ जवळ लाखाची इस्टेट त्याला मिळाली. त्यानें यूरोप, अमेरिका वगैरे देशांत जाऊन फोटोग्राफीचा उत्तम अभ्यास केला, व सात आठ महिन्यापूर्वीच परत येऊन त्यानें "कमला पिक्चर्स कॉर्पोरे-शन" नावाची चित्रपट कंपनी काढली होती, या कंपनीचे जे दोन चित्रपट आतांपर्यंत बाहेर पडले होते त्यामुळें कंपनीची कीर्ति जिकडे तिकडे पसरली होती, व ज्या महत्त्वाकांक्षेनें आपण हा उद्योग आरंभला तो पुरा होणार असें अनुपमेय समाधान चंद्र-कान्त मनांतल्या मनांत उपभोगित होता. उपवर मुलींच्या किती तरी सधन आईबापांचें लक्ष चंद्रकांतावर होतें. पण चंद्रकान्त इत-क्यांत विवाह करावयास तयार नाहीं हें आतां सर्वांना माहीत झालें

होतें. अर्थात्, या निश्चयाबद्दल चंद्रकांताला सर्व जण दुराग्रही व लहरी ठरवीत. पण तसें त्यांनीं म्हटलें तरी चंद्रकांत आपला निश्चय सोडायला तयार नव्हता. कांहीं काळ पूर्ण स्वतंत्र राहून आपलें अंगीकृत कार्य तनमनधन सर्वस्वी लावून करावें अशी त्याच्या जिवाची ओढ होती. तें काम अष्टौप्रहर करण्यांतच त्याला सुखाची परमावधि वाटे. थोडक्यांत म्हणजे महत्त्वाकांक्षेच्या उन्मादांत लांब लांब पावलें टाकीत बेजबाबदार, स्वतंत्र यौवनाच्या हिरवळीवरून चंद्रकांत चालला होता ! आपल्या जोड्यांत कांहीं खुपण्यासारखें असेल असें त्याच्या स्वप्नींहि नव्हतें, आणि आज घटकेपूर्वी आपल्या पायांत कांहीं तरी खुपत आहे, असें त्याला अकस्मात् वाटूं लागलें !

आपल्या सुखांत एक मोठी उणीव आहे असें त्याला आढळून आलें.

असें झालें—

* * *

घटकेपूर्वी—त्यावेळीं संध्याकाळचा सहाचा सुमार असेल—चंद्रकांत आपलें रोजचें काम आटपून कंपनीच्या भव्य आवारांतील आपल्या ऑफिसमध्यें बसला होता. उद्यां कोणकोणते 'सीन' घ्यावयाचे त्याबद्दल सगळ्या खात्यांत नोटिस गेली आहे कीं नाहीं तें त्यानें तपासलें, बऱ्याच बिलावर सह्या करावयाच्या होत्या त्या केल्या, जो नवा चित्रपट तयार होत होता त्याचीं पोस्टर्स अमुक तऱ्हेचीं हवींत म्हणून चित्रकारास सूचना द्यायच्या होत्या त्या दिल्या, चित्रपटाचीं कथानकें लेखकांकडून आलीं होतीं, त्यांस उत्तरें लिहावयाचीं तीं स्टेनोटाइपिस्टला सांगितलीं, नव्या चित्रपटाच्या 'टायटल्स' तयार होत होत्या त्या पाहिल्या व वाटल्या तेथें दुरुस्त केल्या, आणि आतां जावयास हरकत नाहीं अशा

विचारानें त्यानें अंगांत कोट चढविला होता, व " Screen Book " चा नवा अंक आला होता त्याचीं पानें चाळीत तो बसला होता.

इतक्यांत त्याच्या ऑफिसचें पार्टिशन–दार कोणीतरी किंचित् ढकललें; पण पुन्हां चोरटेपणीं मिटून घेतलें.

चंद्रकांत पुन्हां पुस्तक चाळूं लागला, पण पुन्हां पार्टिशन–दाराची पहिल्यासारखीच चोरटी उघडझांक झालेली त्याला दिसली.

म्हणून तो जरा मोठ्या आवाजांत म्हणाला, " कोण आहे ? "

दाराबाहेरच्या व्यक्तीनें दार उगीच किलकिलें करून, खालीं मान घालून, जागेवरूनच, आदबीनें म्हटलें, " मी. "

" तूं होय ? का रे दिनू ?—अन् अरे, आत तर येशील ! ये."

दिनू आत आला, पण अंतरावर उभा राहिला. कांहीं वेळ कांहींच बोलला नाहीं.

त्याच्याशीं थोडा विनोद करावा असें मनांत येऊन चंद्रकान्त म्हणाला, " अरे दिनू, मीं का तुला बोलावलं होतं ?—"

दृष्टि वर न करतां दिनू म्हणाला, " नाहीं—माझंच—काम—आहे—अं–आपल्याकडे—"

" मग मीं तुझ्याशीं बोलायची तूं वाट पाह्यचीस कीं तूं बोल-शील असं मीं समजायचं ? "

असें म्हणून चंद्रकान्त हंसला. दिनूचा अप्रस्तुत विनय किती वेडेपणाचा होता हें त्याला दाखवायचा त्याचा हेतु होता, पण त्या त्याच्या हंसण्यामुळें व बोलण्यामुळें दिनूची मान आणखी खालीं झाली, व आतां तर तो पुरतेंच मौन धारण करील असें दिसूं लागलें. गोगलगाईनें चालावें म्हणून तिला बोटानें डिवचलें कीं ती आणखीच अंग आक्रसून जागच्या जागीं खिळावी तसें दिनूचें झालें.

म्हणून मग चंद्रकांत म्हणाला, " अरे ए वेड्या, असा नुसता

उभा राहिलास तर मी काय समजणार?—बोलशील कीं नाहीं?—हं, सांग पाहूं काय काम आहे तुझं तें—"

असें म्हणून जेव्हां चंद्रकांतानें हातांतलें पुस्तकच बाजूला टाकलें व सिगारेट केसमधील सिगारेट काढून तोंडांत ठेवली आणि हातांतली काडी पेटीवर घांसण्याऐवजीं तशीच धरून दिनू-कडे तोंड केलें तेव्हां दिनूला बोलणें भाग आहेसें वाटलें, व तो म्हणाला,

" थोडसं काम आहे—"

" अरे, काम आहे येवढं मघाशींच सांगितलंस. आतां काय काम आहे तें सांग ना."

" दिवाळी आली—"

" हो, दसरा गेला हें सुद्धां मला माहीत आहे."

चंद्रकांताच्या त्या थट्टेखोर उत्तराचें मर्म लक्षांत येऊन दिनूला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. पण हंसतांनाही आदब सुटूं नये म्हणून त्यानें प्रयत्न केला, व क्षणमात्रच हंसून तो म्हणाला,

" तसं नाहीं. मला दिवाळींत रजा हवी आहे चार दिवसाची."

" वा!" चंद्रकांत म्हणाला, " आठ दिवसांपूर्वी मुद्दाम नोटिस फिरवली आहे ती वाचली नाहींस वाटतं? दिवाळीची सुटी नाहीं, अन् दिवाळीच्या दिवसांत कोणी रजाही मागतां कामा नये असं स्पष्ट लिहिलं आहे ना त्या नोटिशींत? आपल्या नव्या फिल्मचं एक्सपोजिंग २० तारखेपर्यंत सारखं चालू राहिलं तरच कॉंट्रॅक्ट-प्रमाणें तिची कॉपी १ डिसेंबरला करून देतां येईल. म्हणून दिवाळींत कोणाला रजा मिळायची नाहीं अशी नोटिस काढली आहे. आपली मुख्य नटी उषादेवी आपल्याला रजा पाहिजेच म्हणून हट्ट धरून बसली होती, तरी तिचंसुद्धां मी ऐकलं नाहीं हें तूं ऐकलंच असशील—"

" हो. "

" मग काय तर ?—जा; वेडा. रजा नको मागूं—"

त्यावर दिनू कांहीं बोलला नाहीं, पण तो तेथून हाललाही नाहीं.

तेव्हां चंद्रकांत म्हणाला,

" का रे, आतां कां उभा ?—सांगितलं ना, रजा मिळणं शक्य नाहीं—"

" मग माझा राजीनामा लिहून देतों. मी. " दिनू एकदम म्हणाला.

तें ऐकून चंद्रकांतास फार आश्चर्य वाटलें. त्यानें किंचित् हंसून विचारलें, " कां, दुसऱ्या एखाद्या कंपनींत पाहून ठेवली आहेस वाटतं नोकरी ?—"

दिनूनें एकदम मान वर केली, आणि किंचित् उग्र मुद्रेनें म्हटलें

" साहेब, असा बेइमानी नाहीं मी. मी काय, साधा कपडपेट संभाळणारा तुमचा बावीस रुपयांचा नोकर. माझ्या अंगीं ना कला ना कुसर. मला कोण देणार नोकरी दुसरीकडे ? अन् कुठें मिळत असली, अन् पांच रुपये ज्यादा पगार मिळत असला, तरी मी तुमचे पाय सोडून कुठें जायचा नाहीं ! साहेब, हीच माझी परीक्षा केलीत आपण ? "

त्याची चर्या पाहून व तें भाषण ऐकून चंद्रकांताला वाटलें आपण उगीच कठोर प्रश्न केला. तो म्हणाला, "अरे, तसं नव्हे. पण तूं एकदम राजीनामा द्यायला लागलास तेव्हां म्हटलं—"

" मग राजीनामा घ्या म्हणूं नाहीं तर काय करूं साहेब ! "

" कां ?—इतकं कसलं काम अडलं आहे तुझं कुठें—"

" काम नाहीं—"

" मग ? "

" भाऊबीजेसाठीं बहिणीकडे जायचं आहे. "

" शाबास ! " चंद्रकांत विस्मयानें म्हणाला, " अन् त्यासाठीं रजा मागतो आहेस ?—अन् रजा मिळत नसेल तर राजीनामा द्यायची तयारी केली आहेस ?—वा. ! "

आपण ज्या स्वरानें बोललों त्यावरूनच दिनू उमजेल व तेथून जाईल अशी चंद्रकान्ताची कल्पना होती. म्हणून तो जाणार असें गृहीत धरून त्यानें मघाशीं दूर टाकलेला Screen Book अंकही पुन्हां हातीं घेतला.

पण दिनू तसाच उभा राहिलेला पाहून त्यानें म्हटलें,

" अरे दिनू, भाऊबीजेसाठीं बहिणीकडे अगदीं गेलेंच पाहिजे असं नहीं कांहीं. आपल्या कारखान्यातल्या थोड्या का माणसांच्या बहिणी परगांवीं असतील ? ते नाहींका बहिणींकडे गेल्याशिवाय राहणार ?—अन् मला तर बहिणही नाहीं बघ. नात्याची नाहीं अन् मानलेलीही नाहीं !—"

" म्हणूनच आपण असं बोलतां. माफ करा, पण खरंच—"

दिनूचे ते धीटपणाचे शब्द ऐकतांच चंद्रकांताच्या मनावर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. बंधुभगिनींतल्या अनुपमेय प्रेमाचा अनुभव आपल्याला मुळींच नाहीं, त्यामुळें जीवितांतल्या एका नाजूक सुखाला व तद्विषयक सहानुभूतीला आपण खरोखरच सर्वस्वी मुकलों आहोंत काय ?—असा प्रश्न दिनूच्या त्या बोलण्यानें चंद्रकांताच्या मनांत एकदम उभा राहिला.

एकीकडे स्वतःशीं त्या प्रश्नाविषयीं विचार करीत त्यानें दिनूला म्हटलें, " असं ?—भाऊबीजेला तुला बहिणीकडे गेलंच पाहिजे म्हणतोस ?—कोणत्या गांवीं आहे तुझी बहीण ? "

" भिलवडीला. लहानसं गांव आहे तें मिरजेच्या अलीकडे. आमची थोडी शेती आहे तिथें, ती पाहते दुर्गाताई. लहानपणींच बिचारी विधवा झाली. एक मुलगा आहे, त्याला घेऊन राहते

वाडीवर. तिला अन् मला एकमेकांशिवाय कोणीं नाहीं. पण आम्हीं दोघें एकमेकाला आहोंत म्हणून आम्हांला ईश्वरानें भरपूर भाग्य दिलं आहे असंच आम्हीं समजतों. मी वर्षभर असा मुंबईंत रोजगार करतों अन् वर्षाकाठीं एकदां भाऊबीजेला जाऊन दुर्गा-ताईला भेटून येतों. त्या भेटीच्या आशेवर मी वर्षभर रोजगाराचे कष्ट सहन करतों अन् ताई वर्षाची ताटातूट सहन करते. मी गरीब नोकर. मजजवळ पैसे ते कितीसे सांठणार ? जातांयेताचं भाडं भागवून माझ्या हातीं सात रुपये उरतील. पण तेवढी ओवाळणी माझ्या ताईला शतकोटीची वाटेल, अन् दोन दिवस ती मला जें गरिबीच गोडाधोडाचं खाऊं घालील त्या अमृतावरच मीही एक वर्षभर जीव कंठीन !—मला गेलं पाहिजेच !—"

त्याच्या त्या बोलण्याचा चंद्रकांतास मोठा चमत्कार वाटला. कधीं तोंडानें चार शब्द खणखणून न काढणाऱ्या दिनूनें एकदम येवढें वक्तृत्व करावें, हें फार नवलाचें होतें.

दिनूचें आपल्या बहिणीवरील प्रेम अमर्याद होतें, व त्यामुळें याक्षणीं मुखदुर्बळतेची मर्यादा सुटली होती हेंच खरें !

दिनूकडे त्याक्षणीं पाहातां पाहातां चंद्रकान्ताला त्याचा हेवा वाटल्यावांचून राहिला नाहीं. हें भगिनीप्रेमाचें सौख्य आपणांस लाभूं नये हें आपलें दुर्दैव होय, असें त्यांच्या मनांत आलें. त्यानें दिनूला म्हटलें, "बरं, दिनू, तुला देईन मी रजा. पण तुला रजा मिळाली हें कारखान्यांत कोणालाही कळतां कामा नये, समजलास ?"

मग दिनू गेला, आणि चंद्रकान्त टोपी डोक्यावर ठेवून जो बाहेर पडला तो 'पीअर्स' हॉटेलमध्यें येऊन गोष्टीच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें थंड पेयाचा ग्लास समोर घेऊन विमनस्क स्थितींत बसला होता.

* * *

आपण आपल्याला परिपूर्ण सुखी समजत होतों तें खोटें, आपल्या सुखांत एक मोठें न्यून आहे, या नव्या विचारानें चंद्रकान्ताच्या आजपर्यंतच्या साऱ्या सुखाच्या कल्पना विसकटल्या-सारख्या झाल्या होत्या. "तुम्हाला बहीण नाहीं म्हणूनच तुम्ही असं बोलतां" हे दिनूचे शब्द त्याला पुनः पुन्हां आठवत होते. ज्या सुखाच्या अभिमानानें दिनूसारखा यःकश्चित् माणूस आपल्या दारिद्र्याचें आणि दैन्याचें सारें दुःख विसरूं शकतो तें सुख अर्थातच फार फार मोठें असलेंही पाहिजे.

आणि तें सुख कसें असतें तें आपल्याला अजूनपर्यंत समजलेलें नाहीं !

ग्लासांतला एक घोंट घेऊन चंद्रकांत मनाशीं म्हणाला,

"अन् आतां यापुढें कसं समजणार ?"

ठेवलेला ग्लास पुन्हां उचलून घेत,

"मला नात्याची बहीण नव्हतीच, ती आतां यापुढें थोडीच जन्माला येणार ?—"

घोंट घेऊन ग्लास टेंकून त्याच्या कंगोऱ्यावर मधल्या बोटाचें नख आपटीत,

"अन् मानलेली बहीण तरी काय, अशी बाजारांत थोडीच मिळते आहे हवी म्हटली कीं !"

अशा प्रकारें विचार करीत चंद्रकांत किती तरी वेळ त्या स्थळीं बसला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणें प्रातर्विधी आटोपून व बबर्जीनें वाढलेल्या 'छोट्या हजरी'चा समाचार घेऊन चंद्रकांत सान्ताक्रूझवरील आपल्या छोट्या बंगल्यांतून बाहेर पडला, व ८-४३ ची लोकल त्यानें गांठली. बरोबर दहा वाजतां 'एक्स-पोजिंग'ला सुरवात करण्याचा त्यानें क्रम ठेवला होता, व

त्यासाठीं तो स्वतः स्टूडिओंत साडेनवाच्या आंत हजर होत असे.

गाडींत बसतां बसतां त्यानें दैनिक वर्तमानपत्र विकत घेतलें. ज्या सेकंड क्लासच्या डब्यांत तो होता त्यांत दुसरें कोणींच नव्हतें. सकाळच्या या वेळच्या लोकलमध्यें नेहमींच गर्दी बेताची असते. कितीदां तरी सबंध डबा रिझर्व केल्याप्रमाणें चंद्रकांत सांताक्रूझ-पासून शेवटपर्यंत प्रवास करीत असे. म्हणून डबा अगदीं रिकामा असल्याचें पाहून त्याला कांहींच नवल वाटलें नाहीं. त्यानें दैनिक उघडलें व त्यातील जाड टाइपातल्या ओळीवर दृष्टि टाकण्यास प्रारंभ केला.

गाडी दादरच्या स्टेशनपर्यंत केव्हां आली तें त्याला कळलेंही नाहीं आणि तेथून ती निघाली तेंही त्याच्या लक्षांत आलें नसतें. परंतु विजेच्या गाड्या सुरू झाल्यापासून जो एक गिरणीच्या भोंग्यासारखा चमत्कारिक सूर काढायला लोकल गाड्या शिकल्या आहेत तो कानीं यायला, आणि कोणीं तरी प्लॅटफॉर्म-वरून धांवत येऊन आपल्या डब्यांत शिरत आहे असें त्याला दिसायला एकच गांठ पडली. म्हणून त्यानें झटकन वळून पाहिलें.

गाडी हालली असतां डब्यात शिरणारी व्यक्ति एक तरुण स्त्री आहे हें दिसताच त्याला फार विस्मय वाटला. हालत्या गाडींत चढण्याबद्दल तिला धीट म्हणून तिची तारीफ करावी कीं अविचारी म्हणून तिची कींव करावी, हें त्याला क्षणभर समजेना.

चंद्रकांत ज्या बाजूस होता त्याच्या दुसऱ्या बाजूच्या एका बांकावर ती बसली, आणि दम आवरण्यासाठीं तिनें डावा पंजा वक्षःस्थळावर पालथा धरला, आणि उजव्या हातांतल्या रुमालानें तिनें कपाळावरचा, कानशिलांमागचा आणि कंठावरचा घाम पुसला.

तिच्या डाव्या पंजाचें मधलें बोट पोलक्याच्या पहिल्या गुंडीशीं

ओढ घेत असल्यामुळें पोलक्याची मूळ कॉलर बोटभर खालीं सरकल्यासारखी झाली होती व तिच्या वक्षःस्थलाचा नेहमीं न दिसणारा भागही दिसल्यासारखा वाटत होता. तिकडे खिळू पाहणारी दृष्टि विवेकानें वर करून चंद्रकांत म्हणाला,

" आतां तुम्हीं अगदीं करूं नये असं धाडस केलंत. तुम्हांला चढतांना पाहून माझ्या छातींत धस्स् झालं. अपघात काय सांगून का होतो ?—"

त्या तरुण स्त्रीनें चंद्रकान्ताकडे पाहिलें, व झटकन डावा पंजा उचलून व पदर नीट करून म्हटलें,

" मी चढलें कशी याचं माझं मलासुद्धां नवल वाटलं. पण मला तसं करणं भागच होतं. या गाडीच्या आधींचीच गाडी वास्तविक मी पकडायला हवी होती. ही चुकली असती कीं फार घोटाळा झाला असता. मुंबईला जाऊन मला परत यायला पाहिजे इकडे वेळेवर. इथें म्युनिसिपल मुलींच्या शाळेंत मी मास्तरीण आहे. अकराची वेळ चुकवून भागायचं नाहीं म्हणून—"

" असं, असं !—" असें चंद्रकान्तानें म्हटलें खरें, पण त्या तरुण स्त्रीनें केलेलें आपल्या धाडसाचें समर्थन अजूनही त्याला पटलें नव्हतें.

अशा सुकुमार मुलीनें—मुलीनेंच नाहीं तर काय ? ती फार तर पंचवीस वर्षांची असेल—आपली सुंदर काया अशी संकटांत घालावी हें केव्हांही वावगेंच म्हटलें पाहिजे. पूर्वी साध्या वाफेच्या गाड्या होत्या तेव्हां गोष्ट निराळी होती. चतुराईनें चढलें म्हणजे त्या गाड्यांत चालतां चालतां चढण्यांत फारसा धोका नव्हता. पण आतां या विजेच्या गाड्या—

च् ! गाड्या उगीच विजेच्या झाल्या. वाफेच्या होत्या त्याच बऱ्या होत्या. म्हणजे अशा देखण्या मुली जरी अविचारानें धांवत

धावत चढल्या तरी अपघाताचा संभव उद्भवला नसता !—

आपल्या विचारांची मजल एकदम या टोंकापर्यंत गेलेली पाहून चंद्रकांतास आपला आपलाच जरा विस्मय वाटल्यावांचून राहिला नाहीं. त्या मुलीच्या सौंदर्याचा मनावर अतिशय परिणाम झाल्यामुळेंच आपल्या विचाराचा कांटा एकदम असा ढळला हेंही त्याला समजल्यावांचून राहिलें नाहीं. " वाः ! काय आपण एकदम बहकलों ! " अशी स्वतःवर टीका करीत त्यानें वर्तमान-पत्राची घडी पुन्हां उलगडली व डोळ्यापुढें धरली.

तितक्यांत पलीकडच्या डब्यांतून एक तिकिट कलेक्टर आला व " Tickets, please " म्हणून त्याच्यापुढें उभा राहिला.

चंद्रकांतानें खिशांतून पास काढून देतांच त्यावरची तारीख झटकन पाहून तिकिट कलेक्टरनें तो परत दिला आणि मग वळून त्या तरुणीला तो म्हणाला, " Ticket please ! "

तें ऐकतांच त्या तरुणीची चर्या विलक्षण झाली. ती चाचरत म्हणाली,

" मी–मी–पास घरीं राहिला. गाडी सांपडावी म्हणून मी घाईनें निघालें त्यांत—दुसऱ्या पोलक्यांत राहिला पास !—आतां—काय करावं ?—"

" बरं, पासाचा नंबर सांगा—"

" नंबर ?—नाहीं—नाहीं सांगतां यायचा—"

हें उत्तर देतांना तिचा आवाज घाबरेपणामुळें कंप पावत होता, आणि तिकिटावांचून प्रवास करतांना आपण सांपडलों हा अगदीं भयंकर लाजिरवाणा प्रसंग घडला अशा जाणिवेनें तिच्या मुख-मंडलावर लालसर रंग चढला होता.

ती क्षणभर घोंटाळली, व पुन्हां म्हणाली,

" पण मी शपथपूर्वक सांगतें, तिकिट चुकविण्याचा माझा हेतु

नव्हता. केवळ घाईमुळं हें झालं. मजजवळ खरंच थर्डक्लासचा पास आहे—"

"कुठला ?–थर्डक्लासचा ?–" तिकिट कलेक्टरनें एकदम विचारलें.

"हो, खरंच—"

"पण अहो, तुम्ही तर सेकंड क्लासांत बसून प्रवास चालविला आहे !—"

तें ऐकतांच ती तरुणी एकदम विस्मयचकित झाली. तिनें बाकाकडे व डब्यांत इकडे तिकडे पाहिलें, तेव्हां तिचा विस्मय अधिकच वाढला.

मग ती जागेवरून उठत म्हणाली,

"तुम्हांला खरं वाटणार नाहीं, पण शपथपूर्वक सांगतें कीं, सारा माझ्या घाईचा परिणाम. स्टेशनच्या दाराच्या अगदीं समोर जो डबा दिसला त्यांत मी शिरलें. तो कोणत्या क्लासचा आहे हें पाह्यचं मला भानच नव्हतं त्या वेळीं. अन् नंतरही मनांतल्या चिंतेंत मी चूर—"

पण तितक्यांत तिला वाटलें, आपण आपल्या खाजगी चिंतेचा कशाला या तिकीट कलेक्टरजवळ उच्चार करायचा ?

म्हणून तें वाक्य तसेंच टाकून ती म्हणाली,

"माफ करा इतका वेळ मी इथें बसलें याबद्दल. ही मी जातें थर्ड क्लासांत—"

परंतु तितक्यांत चंद्रकांतानें "I say, look here." असें म्हणून व चुटकी वाजवून तिकीट कलेक्टरला आपल्याकडे वळविलेलें तिला दिसलें.

ती जात होती तों चंद्रकांत तिला म्हणाला,

"आपण जागा बदलायचं कांहीं कारण नाहीं. बसा—"

त्याच वेळीं चंद्रकांतानें तिकीट कलेक्टरला एक नोट दिल्याचेंही तिला दिसलें.

तें अगदीं वावगें वाटून " हें काय ? आपण नका माझ्या-साठीं—" असें कांहींसें ती पुटपुटली.

पण चंद्रकांतानें तिला बोलूंच दिलें नाहीं. अतिशय आर्जवाचें हास्य करून तो म्हणाला,

" जाऊं नका. बसा. आपल्याला जागा सोडावी लागली तर माझ्या कर्तव्यांत मीं चुकलों असं मला वाटून मला अगदीं शर-मल्यासारखं होईल—"

काय करावें व काय बोलावें तें त्या तरुणीला सुचेना, ती घोटाळून तशीच उभी राहिली. तेवढ्यात तिकिट कलेक्टरनें रिसीट फाडून चंद्रकांताच्या हातीं दिली. मोडही त्यानें त्याच्या हातीं मोजली, चंद्रकांतानें " Thanks very much " असें म्हटलें आणि ' No mention " असें म्हणून तिकिट कलेक्टर पुढच्या डब्यांत गेला—हें सारें तिला दिसलें व ऐकूं आलें.

मग नाइलाज झाल्यामुळें ती परत आपल्या जागीं बसली. परंतु आपण या तिऱ्हाइत गृहस्थास दंड भरूं दिला हें वावगें झालें, असें अजूनहि तिला वाटत होतें. आणि त्याचे आभार मानायचे झाले तर ते कोणत्या शब्दांनीं मानावेत हेंहि तिच्या मनाला सुचत नव्हतें. त्यामुळें तिच्या चर्येवरची लाली अधिकच वाढली होती.

तिच्या सुंदर मुखकमलावरचा तो रक्तिमा पाहतां पाहतां चंद्र-कांताच्या मनांत काय विचार येत होता कोण जाणे ! मघांशीं जशा त्यानें विजेच्या गाड्या निषिद्ध ठरविल्या होत्या, तशा त्याच्या मनानें या क्षणीं वाफेच्या गाड्याही गैरसोयीच्या ठरवून अशा सुंदर मुलीची भेट होण्यास सर्वांत युक्त वहान पेशवाईतली

पालखी किंवा मेणा ठरविला असणें कांहीं असंभवनीय नाहीं !

परंतु परस्पर संभ्रमाचा हा अल्पकाळ गेल्यानंतर चंद्रकांत व ती तरुणी यांजमध्यें मोकळेपणीं बरेंच संभाषण झालें. त्यांत चंद्रकान्तानें आपली ओळख तिला करून दिली, व तिनेंही आपली हकीकत त्याला सांगितली.

तिचें नांव वत्सला जोशी. तिला एका वडील बहिणीखेरीज नात्यागोत्याचें कोणीही नव्हतें. तिनें ट्रेनिंग कॉलेजमधील शिक्षणक्रम पुरा केला होता, व आज दोन वर्षें ती दादरच्या मुलींच्या शाळेंत नोकरी करीत होती आणि आपल्या बहिणीस घेऊन दादरलाच रहात होती. कारण ही थोरली बहीण विधवा आणि अनाथ होती. तिला वत्सलेवांचून कोणींच नव्हतें. तिचें नांव सीता.

सीतेला Cancer ( तनुव्रण ) झाला होता, व म्हणून चर्नीरोडवरच्या डॉ. भडभडे यांच्या इस्पितळांत वत्सलेनें तिला पोंचविलें होतें. तिला आपली दादरची नोकरी संभाळणें भाग होतें. म्हणून ती सकाळीं एकदां अशी उभ्या उभ्या जाऊन सीतेला भेटून येई, व मग संध्याकाळीं पुन्हां निवांतपणीं जाऊन भेटे.

तें सारें ऐकून चंद्रकान्ताला फार वाईट वाटलें. या नाजूक अल्पवयी मुलीवर स्वतंत्र उपजीविकेचीच नव्हे, तर थोरल्या बहिणीचा सांभाळ करण्याचीही जबाबदारी पडावी ही मोठी दुःखाची गोष्ट होय, असें त्याच्या मनांत आलें. तो म्हणाला,

" अरेरे ! तुमच्या सीताताईवर मोठं संकट आलं आहे म्हणायचं. ज्या चिंतेमुळें सेकंड क्लासमध्यें बसल्याचं ध्यानांत आलं नाहीं म्हणून तुम्ही मघाशीं म्हणतां म्हणतां एकदम जीभ चावलीत ती ही सीताताईच्या बद्दलचीच चिंता ना ?—का आणखी कांहीं—"

" आणखी कांहीं नाहीं. " वत्सला मान हालवून म्हणाली. " पण ही चिंता लहान सहान का आहे ?—आम्ही गरीब माणसं

डॉ. भडभडे फार सज्जन आहेत. पण त्यांचे हाताखालचे डॉक्टर बेपर्वा आहेत, आज आठ दिवस ताईला नेऊन ठेवल्याला झाले, पण स्वतः भडभड्यांच्याकडून एकदां तपासणी व्हायला पाहिजे तीसुद्धां झाली नाहीं. कांहीं विचारलें कीं ते हाताखालचे डॉ. हिडिस फिडिस उत्तर देऊन गप्प बसवतात !—अन् पुन्हां भडभड्यांनीं तपासलं अन् ऑपरेशन करायला पाहिजे म्हणून सांगितलं कीं दुसरा एक मोठा प्रश्न आहेच !—"

"तो कसला ?"

"ऑपरेशनला ते एकंदर तीनचारशेंपर्यंत रुपये घेतील म्हणतात. इतके पैसे कुठनं आणायचे अशा चिंतेंत आहे मी सारखी !—दागिने मोडून लोक पैसे उभे करतात; पण माझ्या या रोल्डगोल्डच्या बांगड्यांचं काय येणार हातांत ?"

हीं वाक्यें वत्सला जवळ जवळ स्वगतच बोलली व तिनें एक सुस्कारा टाकला. पण तितक्यांत तिला वाटलें हें काय आपण आपलें दैन्य सांगून त्या गृहस्थाला त्रास देत आहोंत ?

मग ती एकदम हंसली व विषय बदलण्याच्या हेतूनें म्हणाली,

"डॉ. भडभडे वयानें इतके लहान, पण प्रॅक्टीस जंगी आहे, नाहीं ?—अन् स्वभावानंही फार दिलदार आहेत म्हणें !—"

चंद्रकांत बॉंबे सेंट्रलवर उतरला.

वत्सला पुढच्या चर्नीरोड स्टेशनवर उतरली.

ती इस्पितळांत गेली, व सीताबाईच्या कॉटपाशीं जाऊन उभी राहिली.

वत्सलेला पाहतांच सीताबाईच्या रुग्ण चेहऱ्यावर त्यांतल्या त्यांत आनंदाची छटा उमटली, व ती छटा पाहून हृदय भरून येऊन वत्सलेनें खालीं वांकून त्यांच्या तोंडाजवळ तोंड नेलें, आणि हातानें मस्तक थोपटलें.

मग तिनें वर पाहिलें व डॉ. भडभडे यांच्या मदतनीस डॉक्टर-पैकीं डॉ. कोठारे ज़वळच कोठें असल्यास त्यांस ताईच्या प्रकृती-बद्दल विचारावें, म्हणून इकडे तिकडे दृष्टि टाकली..

रोजची गोष्ट अशी कीं, डॉ. कोठाऱ्यांचीं दहा वेळां आर्जवें करावीं तेव्हां कोठें ते बोलावणें मानून जवळ यावयाचे, व दहा प्रश्न विचारावेत तेव्हां एखादा शब्द बोलायचे.

परन्तु–आज केवढें आश्चर्य !

पलीकडच्या दालनांत डॉ. कोठारे उभे होते. ते वत्सला नजरेस पडतांच हातांतील काम बाजूला ठेवून घाईघाईनें तिच्याजवळ आले.

ते म्हणाले, “ बराच वेळ झाला कीं काय तुम्हांला येऊन ?–”

“ नाहीं–मी आतांच आलें. ”

“ होय ना ? तुमचा एक मिनिटाचाही खोळंबा करतां कामा नये असा मला सक्त हुकूम आहे. ”

“ हुकूम ? कोणाचा—? ”

“ मोठ्या डॉक्टरांचा. ”

“ म्हणजे ? त्यांच्याकडे तर आमची दादही लागली नाहीं अजून ! अन् माझी त्यांची ओळखही नाहीं !—”

“ तें सारं खरं. पण हुकूम झाला आहे खरा मला. चला, तुम्हांला आल्याबरोबर मोठ्या डॉक्टरांना भेटवायची मला ताकीद आहे. चला ”

वत्सला अगदींच आश्चर्यचकित झाली.

आणि खुद्द डॉ. भडभड्यांची भेट झाल्यावर तर तिच्या आश्चर्याला पारावार राहिली नाहीं.

डॉक्टरानीं मोठ्या अगत्यानें तिचें स्वागत केलें, तिच्या तोंडून सीताताईची सारी हकीकत ऐकून घेतली, ताईना ताबडतोब तपासण्याचें आश्वासन दिलें, ऑपरेशनची आवश्यकता असेल तर तेंही

दोन दिवसांत करून टाकूं म्हणून सांगितलें, आणि वत्सलेनें जेव्हां चांचरत विचारलें, " ऑपरेशन करायचं म्हणजे खर्च किती येईल ?—"

तेव्हां त्यांनीं हंसून उत्तर दिलें,

" एक पैसुद्धां नाहीं. "

" म्हणजे ? "

" जास्त आतां बोलायचं नाहीं—" डॉ. हंसत म्हणाले, " तुम्हीं आतां बिनघोरपणीं परत दादरला जा. तुम्हीं संध्याकाळीं याल तंवर मी तुमच्या ताईची तपासणी करून ठेवतों, अन् त्यावेळीं ठरवूं आपण ऑपरेशनचा नक्की दिवस वगैरे—"

भाऊबीजेच्या आदल्या दिवशीं सकाळीं दहा वाजल्यापासून दुपारीं चार वाजेपर्यंत चंद्रकांतानें एक्सपोजिंगचें काम सारखें केलें व थकून जाऊन पुढच्या एक्सपोजिंगसाठीं नट नटी रंगत होतीं तोंवर अर्धा तास विश्रांति घेण्यासाठीं तो आपल्या ऑफिसांत येऊन बसला.

तितक्यांत चपराशी आंत आला व म्हणाला, " बाहेर कोणी बाई आल्या आहेत. भेट घ्यायची आहे म्हणतात. हें नांव दिलं आहे लिहून त्यांनीं. "

तो कागद हातीं घेतांच

" वत्सला जोशी "

हीं वळणदार अक्षरें त्याला दिसलीं, व मनाशीं किंचित हंसून त्यानें चपराशाला म्हटलें, " घेऊन ये त्या बाईंना आंत. "

वत्सला आंत येताच चंद्रकांतानें तिचें स्मितवदनानें स्वागत केलें, व तिला खुर्ची बसावयाला देऊन म्हटलें,

" काय ?—पुन्हां पासावांचून गाडींत पकडलां गेलांत म्हणून माझी आठवण झाली कीं काय ? "

वत्सला हंसली व लगेच म्हणाली, "नाहीं आपल्यालाच पकडायला आलें आहें !"

"मला ? तें कां बुवा ?"

"परवानगीवांचून लोकांवर उपकारांचं ओझं करून ठेवण्याच्या अपराधाबद्दल !"

"म्हणजे ?—मी नाहीं समजलों."

"कशाला समजेल ?—पण मला समजलं आहे ना सारं. त्या दिवशीं मी भडभड्यांच्या इस्पितळांत पोचायच्या आंत आपण बॉंबे सेंट्रलच्या स्टेशनवरून डॉ. भडभड्यांना टेलिफोन केलांत अन् 'वत्सला जोशी ही माझी मानलेली बहीण आहे, तिचं काम ताबडतोब झालं पाहिजे, अन् सीतातांईच्या ऑपरेशनचा सारा खर्च मी देईन' म्हणून त्यांना सांगितलं कीं नाहीं ? कां, आतां कां गप्प ? अन् तुमचा असा टेलिफोन आला हें मला न सांगण्याबद्दल भडभड्यांच्या जवळनं वचन घेतलं होतंत, नाहीं का ?—त्या दिवशीं जेव्हां यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणं इस्पितळांतील वातावरण मला अनुकूल झालेलं दिसलं तेव्हांपासूनच मी आश्चर्य करतें आहें. परवां ताईचं ऑपरेशन उत्तम तऱ्हेनें पार पडल्यावर मी डॉ. भडभड्यांना विचारलं पैशाबद्दल, तेव्हां ते म्हणाले, 'पोंचले आहेत मला सारे पैसे,' मी विचारलं कुठून तर कांहीं केल्या ते सांगेनांत, शेवटीं काल अगदीं त्यांच्या खनंपटीसच बसलें अन् 'ज्यानीं मला बहीण मानली त्याचं नांवही मला माहीत नसावं हें बरं का ?' असं जेव्हां त्यांना मी म्हटलं तेव्हां त्यांचं मन वळलं अन् त्यांनीं खरी हकीगत सांगून टाकली."

"काय मूर्ख आहे डॉक्टर !" चंद्रकांत उद्गारला.

वत्सला हंसून म्हणाली, "छान ! त्यांनीं बिचाऱ्यांनीं बहीण-भावांची गांठ घालून दिली हें चुकलं वाटतं त्यांचं ?—"

"पण तूं मला आपला भाऊ मानायला खरंच तयार आहेस का?"

"तेंच तर सांगायला आलें. उद्यां दादरला आमच्या घरीं जेवायला आलं पाहिजे. उद्यां भाऊबीज आहे. भाऊबीजच्या दिवशीं बहिणीच्या घरीं भावानं जेवायला जायचं असतं, अन् भाऊ देईल ती भेट आनंदानं घ्यायची असते. पैकीं तुमच्या हातची भेट केवढ्या तरी उपकारांची भेट मीं आधींच घेऊन बसलें आहे. आता तुम्हीं माझ्या हातचा दूधभात तेवढा खाणं राह्यलं आहे! जगाहून जरा वेगळीच होते आहे भाऊबीज—पण त्याला इलाज नाहीं! यायचं अं उद्या—"

*　　　*　　　*

दुसऱ्या दिवशीं चंद्रकान्ताला भाऊबीजेच्या सणांतला खरा आनंद जन्मांत पहिल्यानेंच कळला.

आपल्या या पहिल्या भाऊबीजेची हकीगत तो नेहमीं मोठ्या कौतुकानें आपल्या स्नेह्यासोबत्यांना सांगत असतो.

वसुंधरा, ऑक्टोबर १९३०

# शाप आणि उःशाप : : ८

एक कल्पित कथा ऐकली तशी सांगतों.

एक मोठें राज्य होतें. त्या राज्याचा राजा मोठा लोकहितदक्ष होता. त्याच्या उदार धोरणामुळें प्रजाजन सुखांत नांदत होते. व्यापार वाढत होता, व अनेक प्रकारचे धंदे भरभराटीस चढत होते, नवे रस्ते बांधले जात होते, विहिरी खणल्या जात होत्या, नव्या नव्या कालव्यांच्या योजना चालू होत्या, शेती उत्तम होती व कारखान्यासहि तेजी होती. लोक अशा प्रकारें सुखी व संपन्न असल्यामुळें आनंदसंवर्धक कला सर्वांना हव्याशा वाटत होत्या. शिल्प, चित्र, नाट्य, संगीत व कथावाङ्मय या सर्वांचीच वाढ भराभर होत होती. तें पाहून राजाला मनांतल्या मनांत फार आनंद होई. पण आपल्या वृद्ध मंत्र्याकडे तो जेव्हां जेव्हां पाही व त्याचें बोलणें तो जेव्हां जेव्हां ऐके, तेव्हां तेव्हां त्याच्या मनांतल्या या आनंदाचा विरस होई. कारण तो वृद्ध मंत्री म्हणे,

"महाराज, या गोष्टी मला पहावत नाहींत. या सुधारणा नसून कुधारणा आहेत. ज्याला आपण प्रगति म्हणत आहांत, ती अधोगति आहे. आपल्या वडिलांच्या वेळेस या गोष्टी होत्या काय ? छेः छेः ! आपल्या जुन्या परंपरा जात चालल्या ! हें बरं नव्हे. या कलावंतांनीं, चित्रकारांनीं, कवींनीं आणि लेखकांनीं तर अगदीं ताळ सोडला आहे आतांशा ! खुशाल विवस्त्र स्त्रीपुरुषांचीं

चित्रं काढतात आणि स्त्रीपुरुषांच्या एकांताचीं वर्णनं करतात. पूर्वी आमच्या लहानपणीं नग्नावस्थेचीं चित्रं किंवा विलासवर्णनं नव्हतीं असं नाहीं. पण त्यांना अशी मर्यादा होती कीं, तीं देवादिकाचींच असावींत. अहो चारचौघांसमोर नग्न राहण्याचा अगर स्त्रीविलास करण्याचा हक्क देवांचा! आतां तो हक्क चित्रांतलीं आणि कादंबऱ्यांतलीं माणसं उपभोगूं लागलीं, तेव्हां म्हणायचं काय? महाराज, आपलं राज्य अशानं लवकरच रसातळाला जाणार! तें जाऊं नये असं आपणांस वाटत असेल तर मी सांगतों तो उपाय सत्वर करा; किंवा तो करावयाचा नसेल तर या म्हाताऱ्याचा प्राण तरी आपल्या हातांनीं घ्या! मला या बहकलेल्या चित्रकाराचे व लेखकांचे अनाचार उघड्या डोळ्यांनीं पाहवत नाहींत!"

त्या वृद्धाचें असलें बोलणें ऐकलें कीं त्या राजाची उल्हासवृत्ती नाहींशी होई. त्याच्या राज्यांतले चित्रकार व लेखक ज्या कृति निर्माण करीत होते, त्यांत त्याच्या दृष्टीला दूषणीय कांहींच दिसत नव्हतें. परंतु आपल्या वडिलांपासून मंत्रिपदावर असलेल्या त्या वृद्ध मंत्र्याला स्पष्ट शब्दांनीं त्याचा वेडेपणा सांगणेंहि त्याच्या जीवावर येई. म्हणून राजा त्याचें बोलणें नुसतें ऐकून घेई व "पाहूं, पाहूं" असें बोलून ती गोष्ट तेवढ्यावरच सोडी.

परंतु एके दिवशीं वृद्ध मंत्री अगदीं निकरावरच आला. चित्रकारांच्या व लेखकांच्या अनाचारांचें व त्यांपासून उद्भवणाऱ्या अनीतीचें नेहमीचें ठरीव वर्णन करून अखेर त्यानें कमरेची कट्यार उपसली व म्हटलें,

"महाराज, आज या गोष्टीचा सोक्षमोक्ष झालाच पाहिजे. एक, या बहकलेल्या लेखकांचा बंदोबस्त तरी करा, किंवा ही कट्यार छातींत खुपसून मी आपल्या पायाजवळ माझं जीर्ण शरीर टाकतों तें तरी पहा!"

त्या वेळीं त्या वृद्धाची समजूत करण्याची एक युक्ति त्या चतुर राजाला सुचली. तो म्हणाला,

" तुमचं म्हणणं काय ? या लेखकांना शासन केलं पाहिजे एवढंच ना ? "

" होय."

" मग असं करूं, आपल्या राजगुरूंना बोलावून घेऊं. त्यांना तुमचं म्हणणं सांगा. त्यांनीं तुमच्या सूचनेला संमति दिली तर जरूर तुम्ही म्हणतां तशी या कवींना आणि कादंबरीकारांना शिक्षा ठोठावूं."

मग राजगुरूंना बोलावण्यांत आलें. वृद्ध मंत्र्यानें आपलें सर्व म्हणणें त्यांस निवेदन केलें. व त्यानंतर राजा म्हणाला,

" गुरुमहाराज, या बाबतींत माझं कर्तव्य कोणतं तें मला निश्चित कळत नाहीं. आपण सल्ला द्याल त्याप्रमाणें मी करीन."

गुरुमहाराज क्षणभर स्तब्ध राहिले; व नंतर म्हणाले,

" राजा, मी एक कथा तुला सांगतों ती ऐक, व तुझ्या बुद्धीला जें करावेंसें वाटेल तें कर. मंत्री, तुम्हीहि मी सांगतों ती गोष्ट सावधानचित्तानें ऐका; म्हणजे तुमच्या विचारास समतोलपणा येईल. "

राजा व मंत्री दोघांनींहि म्हटलें,

" आम्हीं लक्ष्यपूर्वक ऐकतों. सांगावी गोष्ट. "

" ठीक; ऐका. " असें म्हणून राजगुरूनीं गोष्ट सांगण्यास प्रारंभ केला—

" भोजराजाच्या कारकीर्दीच्या सुमारास दुसरा एक राजा होऊन गेला. त्याचें नांव सुहर्ष. या सुहर्ष राजालाहि राजा भोजराजाप्रमाणें काव्यनाटकादि वाङ्मयाची फार आवड होती. किंबहुना त्या बाबतींत तो भोजराजापेक्षांहि पुढें गेला होता त्यानें

कवींना व लेखकांना मानसन्मानांनीं व धनदानानीं भूषित केलें होतें. इतकेंच नव्हे तर सरस्वतीस तो आपलें कुलदैवत मानूं लागला होता. नगराच्या सीमेला लागून असलेल्या एका विस्तीर्ण उद्यानात त्यानें सरस्वतीचें टोलेजंग मंदीर बांधलें होतें. या देवालयांतील देवी जागृत असल्याचा अनुभवहि वारंवार आला होता. सुहर्षाच्या राज्यांत शेंकडों कवी, नाटककार, कादंबरीकार, लघुकथालेखक सुखासमाधानांत होते व ललितवाङ्मयास कधीं नव्हे असा बहर आला होता. हें पाहून सुहर्षास मोठी धन्यता वाटे.

पण त्याच्या पदरीं सुवर्णेश्वर नांवाचा एक आश्रित होता तो त्याच्या या आनंदाचा नाश करून टाकी. सुहर्षाच्या घराण्यांतील नोकरी सुवर्णेश्वराच्या घराण्यानें पिढ्यान्‌पिढ्या केली होती, त्यामुळें सुवर्णेश्वराला केवळ आश्रितापेक्षा किती तरी अधिक मान राजा सुहर्ष देत असे. सुवर्णेश्वर थोडा चित्रकार व थोडा लेखकहि होता. राणीसाहेबांना सत्यनारायणाची पोथी सांगायचें काम त्याच्याकडेच असे. त्यामुळें सुवर्णेश्वरानें एखादा हट्ट घेतला तर तो पुरविल्यावांचून सुहर्षाला गत्यंतरच नव्हतें, आणि ललित-लेखकाच्या बाबतींत सुवर्णेश्वरानें जो हट्ट धरला होता तो तर फारच चमत्कारिक होता. तो दिवसांतून दहा वेळां सुहर्षाला म्हणे,

महाराज, हे सारे ललितलेखक बहकले आहेत. प्रणय आणि शृंगार यांखेरीज यांना कांहीं सुचत नाहीं. जुन्या पुराण्या समजुतींना चिकटून राहून आजपर्यंत आपण सारे राहिलों, अन् हे आतां नव्या कल्पना आम्हांला सांगताहेत. शृंगार करावा, व्यसनं करावींत—पण चोरून करावींत अशा धोरणानें आमचे बापजादे वागत आले अन् आम्हीहि वागायला शिकलों. पण हे नवे तरणे लेखक खुशाल सांगताहेत कीं शृंगारांत लाजण्यासारखं किंवा लपविण्यासारखं कांहीं नाहीं, अन् उघडपणें व्यसनें करणाऱ्यापेक्षां तीं

चोरून करणाराच अधिक गुन्हेगार आहे. यांच्या वाङ्मयामुळं जुन्या नीतीचा पार धुव्वा उडणार !—उडणार कशाला उडतोच आहे ! आईबापांनीं ठरवलेलीं लग्नं मोडूं लागलीं, तरुण स्त्री-पुरुष खुशाल एकमेकांशीं बोलूं लागले, जननेंद्रियांची शास्त्रशुद्ध माहिती मिळवून हे वेड्यासारखे शहाणे होऊं लागले, काहीं काहीं बाकी ठेवली नाहीं यांनीं ! सरकार मी इतकं कळवळून बोलतों याचं कारण ही आग माझ्या घरापर्यंत येऊन ठेपली आहे ! परवा माझी थोरली मुलगी रात्रीं आरशांत पाहून भांग काढीत होती ! माझा मुलगा नग्न स्त्रियांचीं चित्रं काढूं लागला आहे. घरांतला पोपटसुद्धां " विठ्ठल, विठ्ठल " म्हणायच्या ऐवजीं अश्लील शब्द बोलूं लागला आहे. माझी म्हातारी कुत्री गाभण राहिली आहे ! आणखी काय काय अनाचार पाह्यचं माझ्या कपाळीं लिहिलं आहे कुणास ठाऊक ! सरकार, या ललितलेखकांनीं आपल्या समाजाखालीं सुरुंग ठेवायचं काम चालवलं आहे बरं ! "

सुवर्णेश्वराचें हें व्याख्यान ऐकून सुहर्ष राजाचे कान किटले, शेवटीं एके दिवशीं तो म्हणाला,

" मग सुवर्णेश्वर, तुझं म्हणणं तरी काय ? "

" म्हणणं एवढंच कीं हें वाङ्मय अजिबात बंद झालं पाहिजे. "

सुहर्ष म्हणाला " ठीक आहे. तुझ्या समाधानासाठीं या सर्व लेखकाना गिरफदार करून तुरुंगांत ठेवतों. पण माझ्या प्रजाजनांची वाचनाची आवड कशी भागणार ? "

सुवर्णेश्वर हंसून म्हणाला, " त्याची फिकीर नको सरकार. मी काय कमी जबरदस्त लेखक आहे ? "

" हं ! वेड्या, तुझी ती वेदांची आणि उपनिषदांची शिळी वातड चर्पटपंजरी कां लोकांना हवी आहे ? त्यांना आपल्या भोवतालीं वावरणाऱ्या माणसासारख्या माणसांच्या गोष्टी हव्या ! "

" तशा गोष्टीहि मी लिहीन सरकार. बघा तरी, पण या चेकाळलेल्या लेखकांना आधीं तुरुंगांत टाका. "

त्या दिवशीं सुहर्षाच्या राज्यांत मोठी धरपकड झाली. सगळे नवमतवादी लेखक गिरफदार झाले.

सुवर्णेश्वर आनंदित झाला व एक कादंबरी लिहावयास त्यानें सुरवात केली.

त्या रात्रीं सुहर्षाच्या स्वप्नांत कुलदेवता सरस्वती आली, व म्हणाली,

" राजा, तूं एका मूर्ख वृद्धाच्या नादीं लागून माझ्या भक्तांना बंदिवासांत टाकलं आहेस ! यापुढें मी तुझ्या राज्यांत राहणें शक्य नाहीं. आणि जातांना मी एक शाप देऊन जातें तो ऐक. प्रणयाची हकालपट्टी करायला तूं उद्युक्त झाला आहेस ना ? ठीक. आजपासून तुझ्या राज्यांत कोणाला कोणाचं चुंबन घ्यावसं वाटणार नाहीं ! "

येवढें म्हणून ती क्रुद्ध सरस्वती गुप्त झाली. दुसऱ्या दिवशीं सुहर्ष उपवनांत जाऊन पाहातो तों खरेंच मंदिरांत सरस्वतीची मूर्ति नव्हती !

देवी सरस्वती अदृश्य झालेली पाहून तर राजाला वाईट वाटलेंच, पण पुढें हळुंहळूं देवीच्या त्या विलक्षण शापाचे अनेकविध परिणाम जेव्हां त्याच्या ध्यानांत येऊं लागले तेव्हां तर सुहर्ष अगदीं चिंतातुर झाला.

चुंबनाची कल्पना लोकांच्या मनांतून पार नष्ट झाल्यामुळें स्त्रिया पुरुषांविषयीं व पुरुष स्त्रियांविषयीं सर्वस्वी उदासीन झाले. क्रीडोद्यानांत कोणी फिरकेना. देवळांत देवदर्शनासाठीं येणारीं माणसें अजिबात येईनातशीं झालीं. जत्रा भरल्या तरी तेथें स्त्रीपुरुषांची गर्दी होईनाशी झाली. गवळणीचें दूध खपेना. रंगाऱ्यांना

गिऱ्हाईक मिळेना. नाच, तमाशे, गाणीं बजावणीं बंद झालीं. पानपट्टीच्या दुकानांतले पट्टयांचे ढीगच्या ढीग तसेच सुकून जाऊं लागले. वयस्क माणसाना संतति होईना. तरुणांना विवाहाची इच्छा होईना लहान मुलांचे मुके देखील कोणी घेईना. जणूं सर्वांच्या आया व शेजारणी निर्दय झाल्या. त्यामुळें लहान मुलांच्या रडण्यावरचा एक अमोघ उपाय नाहींसा झाला व त्यांची रडारड घरोघर अहर्निश ऐकूं येऊं लागली. घरोघरच्या संसारांतला आनंद नष्ट झाला, बायकांना नवऱ्याविषयीं तिटकारा वाटूं लागला व नवऱ्याच्या घरीं नादण्याऐवजीं माहेरीं पळून जाणाऱ्या स्त्रियांची संख्या वाढूं लागली. चांगल्या सभ्य खानदानी कुटुंबांतल्या पुरुषांनींहि आपल्या पत्नीस मारहाण केल्याच्या बातम्या राजदूत रोजच्या रोज आणूं लागले. आणि नाना तऱ्हेच्या खटल्यांची न्यायकचेरींत अशी रीघ लागून राहिली कीं, न्यायाधीश रोज जांभया देतां देतां चुटक्या वाजवितां वाजविता अखेरच्या निद्रेला वश व्हायच्या घाईला आले !

प्रजाजनाची ही अवस्था सोडली तरी राजाची स्वतःची अवस्था काय कमी अनुकंपनीय झाली होती ?

जनानखानांतल्या एकाहि राणीपासून त्याला खरें सौख्य मिळेनासें झालें होतें. किंबहुना आपल्या सहवासापासून त्यास सुख होत नसल्यामुळें सर्व स्त्रियांच्या अंगीं थंडाई आली असली पाहिजे असें त्याला उमजूं लागलें होतें, आज कित्येक महिन्यांत तो कोणत्याहि राणीच्या विलास मंदिरांत गेला नव्हता. आवडती राणी व नावडती राणी हा भेदच नाहींसा होऊन सगळयाच राण्या त्याला नावडत्या झाल्या होत्या. कोणत्याहि राणीकडून त्याला आग्रहाच्या संकेताचा निरोपहि आज कितीक महिन्यांत आला नव्हता. सगळयांचाच तो नावडता झाला होता. कोणत्याहि विलासवस्तूची

त्याला इच्छा उरली नव्हती. त्याचीं उंचीं वस्त्रें तशींच पडून राहिलीं, अलंकार भूषणें मळूं लागलीं, आणि माळ्यानें गुंफून ठेवलेल्या गेंदबाज पुष्पमालाहि रोजच्या रोज केवळ जागच्या जागीं उसासे टाकून सुकून जाऊं लागल्या. राजा सुहर्पाला मृगया-देखील हवीशी वाटेना, आणि राज्य कारभाराच्या बाबतींतहि त्याच्या चित्ताची एकाग्रता कांहीं केल्या होईना.

अखेर राजानें सुवर्णेश्वराला बोलावून आणलें व म्हटलें,

" या सर्व अनर्थाला तूं कारण आहेस. तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी वागल्यामुळें सरस्वती रुष्ट होऊन शाप देऊन निघून गेली ! आतां तूंच ही विस्कटलेली घडी बसवून दे. "

सुवर्णेश्वर म्हणाला,

" महाराज, सरस्वतीस प्रसन्न करून परत आणण्याचं काम माझ्याकडे लागलं. हा मी जातों व उपवनांतल्या देवालयांत बसून तपश्चर्येला प्रारंभ करतों. आपण म्हटलं नसतं तरी आज मी तप-श्चर्येला जायला निघणारच होतों. कारण, माझंहि एक मोठं काम अडून राहिलेलं आहे, अन् तें सरस्वतीच्या आशीर्वादावांचून पुरं होणार नाहीं अशी माझी आतां खात्री झालेली आहे."

सुहर्पानें किंचित् विस्मयानें विचारलें,

" असं ? कोणतं तुमचं काम बुवा ? "

" महाराज, लोकांच्या वाचनाची गरज पुरविण्याची हमी मी घेतली होती हें आपणांस आठवत असेलच..."

" पण आज एवढ्या दीर्घकालांतहि तुम्हीं एकसुद्धां ग्रंथ लिहिला नाहींत ! "

" तेंच ऐकावं महाराज. आपल्याजवळ कबूल केल्यावर मी लगेच श्लोकबद्ध रामचरित्र रचावयास प्रारंभ केला. पुष्कळसा भाग मी भराभर लिहून काढला. पण अखेर एके ठिकाणीं माझी

मति व लेखणी जी अडली ती कांहीं केल्या पुढें निघत नाहीं ! ''

" कोणत्या ठिकाणीं ? "

" महाराज, माझ्या त्या श्लोकबद्ध रामचरित्रांत धनुर्भंगाचा पण रामचंद्रानं जिंकला आहे, सीतादेवीचा विवाहदेखील झाला आहे, नववधू सीता रामचंद्राच्या शय्यामंदिरांत प्रविष्टहि झाली आहे, रामप्रभूनं स्मितवदनानं तिला जवळ ओढून घेतलं आहे, सुकुमार जनककन्येनं लज्जेनं मुख वळविलेलं आहे—पण इथं जें घोडं अडलं तें अडलं ! त्या वेळीं रामचंद्राच्या तोंडीं काय भाषण घालायचं तें कांहीं केल्या मला सुचत नाहीं. आज सबंध चातुर्मासभर डोकं खाजवितों आहे पण कांहीं उपयोग नाहीं ! रामचंद्र सीतेचा हात धरून व सीता तोंड वळवून अशीं तीं दोघं माझ्या काव्यांत महिनेन् महिने तश्शीं ताटकळत उभीं आहेत ! "

" अरेरे ! "

" म्हणून मी ठरवलं कीं, सरस्वतीची तपश्चर्या हा एकच या घोटाळयावर उपाय आहे. "

" वेड्या सुवर्णेश्वरा, स्वतःच्या खुळ्या जुनाटपणानं केवढी आपत्ति आणलीस तूं आपणा सर्वांवर ! बरं जा जा. आतां लवकर तपश्चर्येला लाग. "

" हा निघालोंच. "

असें म्हणून सुवर्णेश्वर सरळ उपवनांतील मंदिरांत गेला, व सरस्वतीचें ध्यान करीत बसला.

* * *

कित्येक दिवस खडतर तपश्चर्या केल्यानंतर सुवर्णेश्वरास एके दिवशीं सरस्वतीनें दर्शन दिलें. निदान सुवर्णेश्वरास वाटलें, जी दिसली ती सरस्वतीच असली पाहिजे. तिच्या हातीं वीणा नव्हती, किंवा ती मयूरावर आरूढ झाली नव्हती हें खरें, परंतु गाभा-

ऱ्यांतल्या मूर्तीच्याच जागीं दिसणारी ती स्त्री सरस्वतीखेरीज दुसरी कोण असणार ?

तिला तो वंदन करणार तों—

काय आश्चर्य !

ती त्याच्याकडे पाहून अशा कांहीं अभिनयानें हंसली, कीं, सुवर्णेश्वराची भक्तीची भावना पार नाहींशी झाली, व त्याला आपल्या अंगांत नवयौवनाचा संचार झाल्यासारखें वाटलें.

आपला कांहीं गैरसमज तर होत नाहीं, अशा शंकेनें सुवर्णेश्वर किंचित् गोंधळला. पण तितक्यांत सरस्वतीच पुढें झाली, व त्याला करस्पर्श करून म्हणाली.

" चला, आपण उपवनांत विहार करूं. "

इतकें झाल्यावर सुवर्णेश्वराला बराच धीर आला. त्यानें सरस्वतीचा हात धरला व तो तिच्यासह एका पुष्पवाटिकेच्या बाजूस गेला.

* * *

सरस्वतीचा व सुवर्णेश्वराचा सहवास दिवसानुदिवस वाढूं लागला, पण एकांत असूनहि त्या सहवासांतून विशेष कांहीं निष्पन्न होईना. तीं दोघें वृक्षराजींतून विहार करीत, लतामंडपांत थांबत, आणि झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याच्या कांठीं बसत. पण यापलीकडे कांहींच होत नसे, त्यामुळें सरस्वतीचें सान्निध्य सुवर्णेश्वरास लाभूनहि त्याचें अडलेलें रामचरित्र तसेंच अडलेलेंच राहिलें. रामचंद्राच्या तोंडीं काय भाषण घालावें हें त्याला सुचेना. असें कां व्हावें अशा विस्मयांत सुवर्णेश्वर पडला !

अखेर एके दिवशीं एक कल्पनातीत प्रकार घडला !

सुवर्णेश्वर व सरस्वती एका निबिड कुंजांत बसलीं होतीं ! त्यानें तिचा हात आपल्या दोन्ही हातांत घट्ट धरण्याचें धैर्य केलें होतें !

ती हंसत होती, पण खालीं पाहात होती ! जणूं सुवर्णेश्वरानें कांहीं तरी करावें —निदान कांहीं तरी बोलावें अशी तिची अपेक्षा होती !—

पण कोणत्या कृतीची अथवा कोणत्या शब्दाची तिची अपेक्षा आहे हें सुवर्णेश्वराला कळेना ! तो गोंधळला. नेहमीं हेंच होई ! तिला कांहीं तरी हवें आहे असें त्याला वाटे. पण काय हवें असावें हें त्याला समजत नसे ! या गोंधळाचा शेवट कसा करावा तें त्याला सुचत नसे ! तो फक्त तिचा हात घट्ट धरी, व ती गोष्ट तेवढ्यावरच राही !—

त्या दिवशीं मात्र ती तशी राहिली नाहीं.

कारण सुवर्णेश्वरानें हात जोरानें दाबतांच सरस्वतीनें आपली मान त्याच्या खांद्यावर टेकली, तिरप्या मादक दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें, हनुवटी किंचित् वर केली व म्हटलें,

" प्रियकरा, माझं चुंबन नाहीं कां बरं घ्यायचं ? "

चुंबन !

तो शब्द ऐकतांच सुवर्णेश्वर ताडकन् उठला ! एकदम एक मोठा उलगडा झाल्यासारखें त्याला वाटलें !

त्यानें तिला खसकन् जवळ ओढून एखाद्या बुभुक्षितासारखें तिच्या लुसलुशीत रक्तवर्ण ओंठाचें चुंबन तर घेतलेंच ! पण नंतर तिला दूर लोटून त्यानें जी धूम ठोकली ती एखाद्या पिसाटासारखी.

सुवर्णेश्वरा ! माझ्या प्राणा ! अशा हांकावर हांका सरस्वतीनें मारल्या, पण त्यानें मागें वळून पाहिलें नाहीं !

त्यानें तडक घर गांठलें.

रामचरित्र जेथें अडलें होतें तेथें काय लिहावयाचें तें त्याला आतां समजलें होतें, व त्या उन्मादांत तो होता.

त्यानें लेखणी शाईंत बुडवून घेतली, व सीतेचा हात हातांत

घेऊन आज कित्येक दिवस वेड्याप्रमाणें उभ्या राहिलेल्या रामचंद्राच्या तोंडीं पुढील श्लोकार्ध घातला.

मुख नको फिरवूं सखि या क्षणीं ।
अधरचुंबन दे मज कामिनी ॥

रामचंद्राच्या तोंडचा तो श्लोकार्ध लिहिल्यानंतर सुवर्णेश्वराची लेखणी कोठेंहि अडखळली नाहीं. त्यानें अल्पावधींत रामचरित्र लिहून पूर्ण केलें.

त्यानें राजाची गांठ घेतली, व ग्रंथ पुरा झाल्याचें कळविलें.

सुहर्ष राजास आनंद झाला. त्यानें विचारलें,

" पण ग्रंथांत एके ठिकाणीं तूं अडून राहिला होतास ती तुझी अडचण कोणी दूर केली ? सरस्वतीनं ? ती तुझ्यावर प्रसन्न झाली काय ? "

सुवर्णेश्वरानें हात जोडले व म्हटलें,

" महाराज, ती रू..ा हकीगत जरा खाजगी आहे. पुढें केव्हां तरी ती आपणांस निवेदन करीन. सध्यां हें रामचरित्र मी पूर्ण केलेलं आहे, त्याचा यथोचित पुरस्कार सरकारनीं केला म्हणजे मला फार संतोप होईल.

सुहर्ष म्हणाला,

" ठीक आहे, उद्यां मोठा दरबार भरवूं. त्यांत तुम्ही आपला ग्रंथ वाचून दाखवा, व ग्रंथवाचनानंतर तुमचा आम्हीं मोठा सन्मान करूं."

सुवर्णेश्वर फार हर्षभरित झाला, तो दुसऱ्या दिवशीं आपल्या ग्रंथाचं बाड खाकोटींत मारून दरबारांत आला तो मोठ्या ऐटीनें.

राजसभेंत हजारों स्त्री–पुरुष उपस्थित झाले होते. राणीवशांतील स्त्रियांची देखील गोषांत दाटी झाली होती. आज कित्येक महिन्यांत कोणालाच कथावाङ्मय वाचावयास मिळालें नव्हतें, त्यामुळें

सुवर्णेश्वर आपला नवा ग्रंथ वाचून दाखविणार आहे हें समजतांच सर्वांची उत्सुकता तीव्रतम झाली होती.

वेळ होतांच राजा सुहर्ष सभेंत येऊन आपल्या सिंहासनावर विराजमान झाला व सुवर्णेश्वरानें रामचरित्र वाचण्यास प्रारंभ केला. सभा चित्रासारखी तटस्थ होऊन ऐकूं लागली.

रामजन्म झाला. रामाचें बालपण संपलें. धनुर्भंगाचा पण जिंकून रामानें जानकीला वरिलें, जानकी अयोध्येस आली, योग्य दिवशीं नवदांपत्य रात्रीं एकांतांत प्रविष्ट झालें, रामचंद्रानें जानकीचा हात धरून तिला जवळ ओढलें, तिनें लज्जेनें मुख फिरविलें, व त्यावर रामचंद्रानें म्हटलें,

" मुख नको फिरवूं सखि या क्षणीं ।
अधरचुंबन दें मज कामिनी ॥ "

सुवर्णेश्वराच्या तोंडून " अधरचुंबन " हा शब्द ऐकतांच सर्व स्त्री-पुरुष एकसमयावच्छेदेंकरून चमकले.

चुम्बन !

ओहो ! हेंच ! जें आपल्याला आज कितीक महिने सुचत नव्हतें तें हेंच !—

आणि राजसभेचे नियम धाब्यावर बसवून सर्व स्त्री-पुरुषांनीं तेथून पाय काढला, व त्वरेनें आपापलें घर गांठलें ! क्षणापूर्वी स्त्री-पुरुषांनीं फुललेली राजसभा क्षणार्धांत वठलेल्या वृक्षमूलासारखी दिसूं लागली !

राणीवशांतील स्त्रिया धांवत आपापल्या विलासमंदिराकडे गेल्या ! राजा सुहर्षहि उठला, व राजाला न शोभणाऱ्या लगबगीनें आपल्या पट्टराणीकडे गेला. तेथून तो किती राण्यांच्या भेटीला गेला त्याची नोंद उपलब्ध नाहीं !

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं सुवर्णेश्वरास राजाकडून निरोप

आला कीं, असाल तसे भेटीला या.

सुवर्णेश्वराला वाटलें राजा आपल्यावर प्रसन्न झालेला, तो आतां आपल्याला कांहीं तरी पारितोषक देणार ! तो मोठ्या खुषींत राजवाड्याकडे गेला.

परंतु तो तेथें जाऊन पाहतो तों नसतेंच लचांड उपस्थित झालेलें !—

राजासन्निध एक स्त्री उभी होती !

सुवर्णेश्वरानें तिला ताबडतोब ओळखिलें !

सरस्वतीच ती !

कितीकदां तरी तिच्या हातांत हात घालून त्यानें उपवनांतील पुष्पवाटिकातून स्वच्छंद विहार केला नव्हता काय ? तिचीं त्याचीं किती तरी मधुर भाषणें झालीं नव्हतीं काय ? सुहर्षाच्या राज्यांत विस्मृत झालेली चुंबनाची कल्पना तिनेंच त्याच्या कानांत हलकेंच उच्चारली नव्हती काय ? आणि तिचेंच गाढ चुंबन घेऊन—

सुहर्षानें त्याला प्रश्न केला,

" ही स्त्री म्हणते तूं तिचा पत्नी म्हणून स्वीकार केला पाहिजेस. कारण तूं तिचें एकांतांत—"

सुवर्णेश्वरानें लज्जेनें मान खालीं घातली.

सुहर्ष म्हणाला,

" वा ! सुवर्णेश्वरा, तूं असली कांहीं गोष्ट करशील अशी कल्पना नव्हती. ही सांगते तें सारं खरं आहे काय ? "

' होय महाराज ! '

' मग हिला स्वस्त्री म्हणून घरांत घ्यायला तूं तयार आहेस काय ?'

' होय. मी आपल्याला जें म्हटलं होतं कीं, माझ्यांत व देवी सरस्वतींत कांहीं खाजगी गोष्टी घडल्या त्या याच. '

राजा सुहर्ष एकदम विस्मयातिशयानें उद्गारला,

‘ काय ? ही स्त्री दुसरी कोणी नसून प्रत्यक्ष देवी सरस्वती आहे ?”

“ होय महाराज. ’

परंतु हे शब्द सुवर्णेश्वराच्या तोंडून पुरते बाहेर पडले नाहींत तोंच ती स्त्री मोठ्यानें हंसून म्हणाली,

‘ हा मतिमंदा, मला सरस्वती समजलास काय ? वा रे अक्कल तुझी ! ’

सुवर्णेश्वरानें आश्चर्यानें विचारलें,

‘ म्हणजे ?—तूं सरस्वती नव्हेस ? ’

यावर उत्तर देण्याऐवजीं ती स्त्री नुसती मोठमोठ्यानें हंसत सुटली.

अखेर राजा सुहर्षानें तिला म्हटलें,

‘ मग तूं कोण आहेस ? ’

ती स्त्री म्हणाली,

“ तें देवी सरस्वतीलाच विचारा. मी सरस्वतीहि नाहीं, अन् आत्तां दिसत आहे अशी रूपसंपन्नहि नाहीं ! चुंबनाला, प्रेमाला, शृंगाराला हटवादानं झिडकारणाऱ्या या जीर्णमति बुद्धिजडाचे डोळे उघडायसाठीं सरस्वतीनं मला हें सुस्वरूप कांहीं काळ दिलं होतं. त्याची मर्यादा आतां संपली. मी खरी कशी आहे पहा ! ’

सुहर्षानें व सुवर्णेश्वरानें पाहिलें तो काय चमत्कार ?

क्षणापूर्वी दृष्टीला भुरळ पाडण्यासारखें जें सौंदर्य त्या स्त्रीच्या ठिकाणीं दिसलें होतें तें पार नाहींसें झालें !

ती स्त्री काळी, कुरूप व वक्रदंत, एकाक्षी होती !

सुवर्णेश्वर डोळे फिरवून ओरडला,

“ छे छे ! महाराज, ही कोणी तरी चेटकी आहे ! हिला मी स्वस्त्री म्हणणार नाहीं ! ”

त्या स्त्रीचे वक्रदंत अधिकच स्पष्ट दिसले त्यावरून ती हंसली असावी. ती म्हणाली,

' माझं चुंबन घेतलंस तेव्हां कां नाहीं विचार केलास ? महाराज, हा सुवर्णेश्वर कांहींहि म्हणाला तरी आपण ऐकतां कामा नये. याची माझी जोडीच युक्त आहे. माझं नांव "जीर्ण परंपरा" मला एकच डोळा आहे म्हणून मला नीट दिसत नाहीं. नव्या कल्पनांवर दातओंठ खाऊन माझे ओंठ सुजले आहेत व दांत वाकडे झाले आहेत. सरस्वतीची मी सावत्र बहीण ! या सुवर्णेश्वरासारखे लोक हेच माझे प्रियकर ! याला सांगा माझा हात धरून मला आपल्या घरीं न्यायला ! "

सुवर्णेश्वरानें हंबरडा फोडला, व " महाराज, मला वांचवा " असा दीन स्वर काढून धरणीवर अंग टाकलें !

राजा सुहर्ष मोठ्या घोटाळ्यांत पडला.

या विचित्र खटल्याचा काय निकाल सांगावा तें त्याला सुचेना !

इतक्यांत कोठून तरी मधुर वीणाझंकार ऐकूं आला !

राजानें चमकून वर पाहिलें.

वीणारव जवळ येत आहेसें त्याला वाटलें व अखेर प्रत्यक्ष सरस्वती त्याच्यासमोर उपस्थित झालेली त्याला दिसली !

राजा सुहर्ष झटकन आसनावरून उठला, व वंदन करून म्हणाला,

" देवी या अज्ञ बालकावरचा राग किती दिवस ठेवणार ? "

देवी सरस्वती हंसली, व म्हणाली,

" वत्सा, या वेड्या सुवर्णेश्वराच्या म्हणण्याप्रमाणं तूं वागूं लागलास म्हणून केवळ पर्यायानं मी तुझ्यावर रागावलें. माझा खरा राग याच्यावर होता. त्याला जो धडा शिकवायचं मी योजलं होतं तो मी त्याला शिकवला आहे. आतां पुन्हां प्रीतीची वृथा

निंदा करण्यास त्याची जिव्हा धजणार नाहीं. माझे प्रिय भक्त बंदींत टाकले आहेस त्यांना मुक्त कर व पूर्ववत् त्यांचा सन्मान ठेव म्हणजे तुझ्या राज्यांत वाङ्मयाची व त्यामुळेंच पराक्रमाचीहि नेहमीं अभिवृद्धि होईल ! ”

येवढा उःशाप देऊन देवी सरस्वती अंतर्धान पावली ! ”